






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

पंढरीसी जाता । दुपार टळली
विठ्ठलपूजेची जाई । ओट्यात फुलली ।।
समुद्रा ग मध्ये । लाटांचं उभं शेत ।
फेसाचं पीक येतं । अपरंपार ।।



# मराठी अभ्यास परिषद पत्रिका

## भाषा आणि जीवन

वर्ष १३ : अंक २ : उन्हाळा १९९५



अनुक्रमणिका

**अनुक्रम**



मुखपृष्ठ / पल्लवी आपटे; जात्यावरील ओव्या (साने गुरुजी संपादित, स्त्री जीवन)

---

**प्रकाशन** : त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)

**संपादन-समिती** : कल्याण काळे (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, विजया देव, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर.

**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक** : कल्याण काळे, मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे - ४११ ००७ (दूरध्वनी : ३५६०६१ / २४)

**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा** : मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवणे, पुणे - ४११ ००४ (दूरध्वनी : ३३३८६९)

**पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर** : आवरण पृष्ठ तीन पहा.

**सूचना** : पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

---

**संपादक** : कल्याण काळे **प्रकाशक व मुद्रक** : मराठी अभ्यास परिषदेसाठी – मृणालिनी शहा
**मुद्रण स्थळ** : सहकार मुद्रणालय, ५४० गणेश पेठ, पुणे - २.

# संपादकीय

भाषा आणि संस्कृती यांचा संबंध अनोन्यसाधारण असतो, हे आपल्याला परिचित आहे. तथापि हे दोन्ही शब्द आणि त्यांचे साहचर्य यांच्या अतिपरिचयाने आपण त्यांचा अर्थ पुरेशा गांभीर्याने लक्षात घेत नाही. भारत हा बहुभाषिक देश असल्यामुळे भाषेचे सांस्कृतिक महत्त्व आपण अधिक खोलवर समजून घेतले पाहिजे. भाषाभगिनी या शब्दाकडे फक्त राजकीय किंवा सामाजिक घोषणांच्या स्वरूपात न पाहता त्यातील गर्भितार्थ निरनिराळ्या पद्धतीने समजून घेण्याची गरज आहे. भाषावार प्रांतरचना झाली त्याच्या आधीपासून आणि नंतरही विविध भाषिक वैशिष्ट्ये किंवा धार्मिक-भाषिक विविधतेतून दिसणारी एकता, यांचे मर्म जाणण्याचे प्रयत्न बदलत्या काळाच्या संदर्भात पुन:पुन्हा करण्याची गरज असते.

हिंदी, कन्नड, तेलुगु, गुजराती या सर्व भाषा मराठीच्या भाषाभगिनी होत. भौगोलिकदृष्ट्या आपल्या राज्याच्या अगदी शेजारी असणाऱ्या राज्यातील भाषेशी आपला सांस्कृतिक दृष्ट्या अधिक निकटचा संबंध आहे. परंतु येथे एक वस्तुस्थिती लक्षात घ्यावी लागते. या भाषिक-सांस्कृतिक गोर्ष्टींचा राजकारणाशीही जवळचा संबंध असतो. त्यामुळे शेजारशेजारच्या प्रांतात व सीमारेषेवरील भागात राजकीय हितसंबंध असलेले लोक आपापल्या हेतूंसाठी एकमेकांबद्दल अपसमजुती निर्माण करतात. राजकीय सामाजिक हेतूंमुळे निर्माण झालेल्या परिस्थितीचा परिणाम नकळतपणे भाषेवर होत असतो. शिवाय काळाच्या ओघात एका भाषेचे दुसऱ्या भाषेवर सतत आक्रमण होत असते- भाषेवर आघात होत असतात. भाषेची अंगभूत क्षमता एवढी जबरदस्त असते की, भाषा मात्र सर्व आघात सोसून होणाऱ्या बदलांना आपल्यात सामावून घेत जिवंत राहात आपले कार्य करतच राहते.

मराठीच्या बाबतीत ह्याचा प्रत्यय नेहमीच येतो. महाराष्ट्रातील मराठीवर मोगल साम्राज्याच्या काळापासून फारसीचे आणि इंग्रजांच्या राजवटीपासून इंग्रजीचे आक्रमण होत राहिलेले आहे. हे आक्रमण इतके तीव्रतर स्वरूपाचे होते की, मराठी भाषा मुमूर्षू आहे काय? असा सवाल इतिहासाचार्य राजवाडे यांनी सप्रमाण केला होता. तरीसुद्धा मराठी भाषा तिच्या अंगभूत अंत:सामर्थ्यानिशी टिकूनच आहे.

परकीय भाषांप्रमाणेच भारतीय भाषांबाबतही हा मुद्दा लक्षात घ्यावा लागतो. कारण महाराष्ट्राच्या भोवतालच्या भाषांचाही परिणाम मराठीवर झालेला आहे. (उदा. कन्नड, तेलुगू, गुजराती इ.) आणि तरीही मराठी तिच्या सामर्थ्यानिशी टिकून राहिली आहे.

एवढेच नाही तर महाराष्ट्राबहेरही मराठी भाषक समाज जिथे जिथे आहे तिथे

तिथे मराठी भाषा आपले अस्तित्व टिकवून आहे. परप्रातांत तिथल्या भाषेच्या साहचर्यातच मराठी समाज आपली मातृभाषा जिवंत ठेवतो. कारण त्यांनी आपली संस्कृती टाकलेली नसते. भाषा व संस्कृती यांचे नाते अतूट असते, अशावेळी याची प्रचीती येते. महाराष्ट्राबाहेर राहणाऱ्या मराठी भाषकांच्या भाषिक गरजा काळाच्या ओघात बदलत असतात. त्यांच्या या बदलत्या गरजांचे अवलोकन करण्याची आवश्यकता पुन:पुन्हा भासत असते. त्यांच्या गरजा लक्षात घेऊन महाराष्ट्राबाहेरील मराठी समाजाच्या भाषिक संस्कृतीचे संरक्षण-संवर्धन-पोषण करणे ही महाराष्ट्रात राहणाऱ्या मराठी समाजाची जबाबदारी असते, कर्तव्य असते.

ह्या जबाबदारीची आणि कर्तव्याची जाणीव असणाऱ्या ज्या काही मोजक्या संस्था आहेत त्यात राज्य मराठी विकास संस्थेचा समावेश करावा लागतो. मराठी भाषेचे संवर्धन करण्याच्या हेतूने या संस्थेची स्थापना महाराष्ट्र शासनाने केली आहे. भाषेचा विविधांगी विकास करण्यासाठी महाराष्ट्राबाहेरच्या काही संस्थाही कार्यरत असतात. गुलबर्ग्याच्या कर्नाटक राज्य मराठी साहित्य परिषद या संस्थेने राज्य मराठी विकास परिषदेच्या संयुक्त विद्यमाने (सहकार्याने) एक चर्चासत्र मार्च महिन्यात आयोजित केले होते. कर्नाटक आणि महाराष्ट्र या दोन राज्यांचा अनेक शतकांचा सांस्कृतिक ऋणानुबंध आहे. हे सांस्कृतिक संबंध साहित्यातून-कलेतून सहजतेने प्रत्ययाला येतात. भाषा आणि संस्कृती यांचे संबंध समजावून घेण्याचा एक मार्ग म्हणजे साहित्याची चर्चा करणे हा असतो. या दोन्ही भाषांतील साहित्यातील काही प्रेरणासूत्रे समान आहेत. त्या समान प्रेरणासूत्रांचा जर तौलनिक अभ्यास झाला तर या दोन राज्यातील सांस्कृतिक धागे अधिक स्पष्ट होण्याची शक्यता असते. म्हणून हे चर्चासत्र स्वातंत्र्योत्तर मराठी-कन्नड साहित्य या विषयावर आयोजित केले होते.

गुलबर्गा येथे आयोजित केलेल्या चर्चासत्रासाठी महाराष्ट्र आणि कर्नाटक या दोन्ही राज्यातून साहित्यिक, विचारवंत, अभ्यासक, निबंधवाचक, पत्रकार, निरीक्षक आणि रसिक जाणकार वाचक असे विविध प्रकारचे लोक आले होते. या सहभागी झालेल्या लोकांमध्ये काही मराठी भाषक होते, काही कन्नड भाषक होते तर काही द्वैभाषिक होते (कन्नड व मराठी जाणणारे). या संमिश्र भाषा-भाषी श्रोत्यांची सोय येथे पाहिली होती. उद्घाटन समारंभापासूनच या चर्चासत्राचे वैशिष्ट्यपूर्ण वेगळेपण लक्षात येण्यासारखे होते. उद्घाटनसत्रातील स्वागतापासून आभारापर्यंतचा कार्यक्रम मराठी व कन्नड अशा दोन्ही भाषांतून पार पडला. मराठीतले स्वागत-गीत झाले की कन्नडमधील स्वागतगीत म्हटले गेले. प्रत्येक निवेदन दोन्ही भाषांतून केले जात होते. कुलगुरू रुद्रय्या यांचे भाषण अस्खलित कन्नडमधून झाले. डॉ. तोरो यांनी दुभाष्याचे उल्लेखनीय कार्य केले. सर्व भाषणाचा सारांश त्यांनी मराठीत नेमकेपणाने सांगितला. या कार्यक्रमात एकच अपवाद होत. मराठी कथाकार के. ज. पुरोहित यांच्या इंग्रजी भाषणाचा. बाकी कोठेही मराठी-कन्नड सोडून दुसरी कोणतीही भाषा वापरली गेली नाही.





अनुक्रमणिका

तीन दिवसंच्या या चर्चासत्रातील सत्रांमध्ये कन्नड साहित्याचा (कथा, कादंबरी, नाटक इत्यादी प्रकारानुसार) परामर्श घेणारे निबंधही कन्नडमधूनच वाचले गेले. मराठी भाषकांना त्याचे मराठीत भाषांतरित केलेले मुद्रित निबंध दिलेले असत. त्यामुळे कन्नड भाषेतील निबंधांचा श्राव्य परिणाम अतिशय परिणामकारकरीत्या साधला गेला. संयोजकांच्या कार्यपद्धतीतील पूर्वनियोजितपणामुळेच हे घडू शकले. हाच प्रयोग मराठी साहित्याच्या निबंध वाचनाच्या वेळी केला होता. दोन निबंधाच्या प्रती पूर्वनियोजित वेळेवर संयोजकांना पोहचू शकल्या नव्हत्या. अशा निबंधांचे सारांशात्मक भाषांतर तात्काळ करण्याचे कौशल्य डॉ. तोरो, डॉ. जगन्नाथ लिशी, डॉ. भालचंद्र शिंदे यांच्या सारख्या विचक्षण दुभाष्यांनी केले. व्यावसायिक दुभाषी नसतानाही त्यांनी दाखवलेले कौशल्य उल्लेखनीय होते.

दोन प्रादेशिक भाषांचा त्यांच्या सांस्कृतिक व साहित्यिक अनुबंधांचा तौलनिक परामर्श घेताना कोणत्याही समाईक भाषेचा आधार घेतला गेला नाही. तरीही मराठी किंवा कन्नड भाषकांना परस्परांचे विचार समजून घेण्यास कसलीही अडचण आली नाही. चर्चासत्रासाठी आलेल्या सर्वप्रकारच्या श्रोत्यांनी खरोखरीच एक अपूर्व अनुभव घेतला. सामान्य भाषेचा आश्रय न घेताही बौद्धिक आनंद देणारा हा उपक्रम प्रशंसनीय आहे. समाईक भाषेचा जो बाऊ केला जातो तो किती निरर्थक आहे याचा प्रत्यय या निमित्ताने आला. अशा अभिनव उपक्रमांची पुनरावृत्ती झाली तर भाषिक तणाव दूर होऊन सांस्कृतिक संबंध वाढीस लागतील.

तीन दिवसांच्या या चर्चासत्रात कन्नड आणि मराठी अभ्यासकांनी, समीक्षकांनी अणि साहित्यिकांनी दोनही भाषांमधील समान प्रेरणांची तौलनिक निरीक्षणे नोंदवली व त्यातून काही निष्कर्षही काढले. परंतु त्याहीपेक्षा या चर्चासत्राच्या निमित्ताने रसिक आणि सामान्य वाचकांमध्ये जे परस्परसामंजस्य निर्माण झाले ते अधिक महत्त्वाचे होते. चर्चासत्र आयोजित करण्यामागचा हेतु फलद्रूप झाला. परप्रांतातल्या मराठी भाषकांच्या भाषिक गरजांचे निवारण होण्यास मदत झाली.

महाराष्ट्र आणि कर्नाटक या प्रांतांत दोन भिन्न प्रादेशिक भाषा नांदत असूनही या प्रांतांचा सांस्कृतिक पट्टा एकच आहे, याचीही जाणीव या निमित्ताने पुन्हा एकदा झाली. आणि म्हणूनच मराठी-कन्नड संबंध तपासून पाहणे, भाषिकदृष्ट्याही महत्त्वाची बाब आहे. भाषा समृद्धीसाठी अशा अभ्यासाची निश्चितच मदत होते. मराठी-कन्नड या दोन भाषांमध्ये अणि त्यांच्या साहित्यामध्ये अनुबंध निर्माण करणाऱ्या या उपक्रमाने मराठीच्या आणि कन्नडच्या अंगभूत अंत:सामर्थ्याचा प्रत्ययही अधिक प्रकर्षाने आला यात शंका नाही.

**- मृणालिनी शहा**

# संतसाहित्यातील कथनसरणी

- माधव ना. आचार्य

१. प्राचीन मराठी कथाकाव्याने व्यापलेला कालखंड जवळ जवळ पाचशे वर्षांचा आहे. इ. स. च्या तेराव्या शतकाच्या उत्तरार्धातील महदंबेपासून तो इ. स. च्या अठराव्या शतकाच्या उत्तरार्धातील मोरोपंतांपर्यंत हा कालखंड पसरलेला आहे. यामध्ये महानुभावांनंतर एकनाथांसारखे संतकवी, मुक्तेश्वरासारखे कलाकवी, वामन मोरोपंतांसारखे पंतकवी व श्रीधरासारखे पुराणिक कवी असे विविध वृत्तींचे कवी होऊन गेले. यांपैकी संतकवींच्या कथनसरणीचे स्वरूप या लेखात थोडक्यात मांडून पाहावयाचे आहे.

२. **वृत्तिचतुष्टय :** प्रथम परिच्छेदामध्ये उल्लेखित उदाहरणांवरून या कथाकारांचे चार ठळक वृत्तिविशेष नोंदता येतील.

संतवृत्ती, कविवृत्ती, पंतवृत्ती व व्यासवृत्ती- यांपैकी संत व पंत हे उघडच कथा कवींचे दोन वर्ग आहेत; परंतु त्या वृत्तीही असल्यामुळे त्यांचा (मम्मटाचे अनुकरण करून) 'संतसंमित वृत्ती' व 'पंतसंमित वृत्ती' असाही अभिप्राय असल्याचे मान्य करून पुढे जाऊ या.

येथेच आणखी एक नोंद करून ठेवू. हे वृत्त्यनुसारी वर्ग प्रामाण्यव्यपदेशन्यायाने केलेले आहेत. एकाच कवीमध्ये एकाहून अधिक वृत्तिविशेष आढळून येणे स्वाभाविक आहे. उदा., ज्ञानदेवांच्या कथनात (- आणि ज्ञानदेवी ही एक 'शांतिकथा' असल्यामुळे, कथनसरणीच्या विचारात तिचा अंतर्भाव करणे अयोग्य होणार नाही.) संतवृत्ती व कविवृत्ती यांचे, तर एकनाथांच्या कथनात संतवृत्ती व व्यासवृत्ती यांचे विलयन आढळून येते. मोरोपंतांसारख्या पंतकवीच्या कथनाला काही ठिकाणी संतवृत्तीचा स्पर्श झालेला मिळतो.

३. उपर्युक्त वृत्तींचे स्वरूप आता लक्षात घेऊ.

**३.१) संतवृत्ती :** 'संत' हा शब्द 'अस्' धातूच्या वर्तमान कृदन्तावरून व्युत्पादिला जातो. जे सदैव 'असते', ते 'सत्'; त्याची जाणीव ज्याला आहे, तो संत. म्हणूनच ज्ञानदेव म्हणतात,

*एया उपाधिमाझि गुप्त। चैतन्य असे सर्वगत।*
*तें तत्त्वज्ञ संत। स्वीकरीति।। (ज्ञानदेवी - २.१२६)*

येथील 'उपाधी' हा शब्द लक्षात घेण्याजोगा आहे. संस्कृतात पुंलिंगी असलेला हा शब्द मराठीत स्त्रीलिंगी बनला. हा शब्द, 'दु:ख, संकट, त्रास, अडचण, ब्याद, लचांड' या अर्थी स्थूलपणे व्यवहारात वापरला जातो. शास्त्रामध्ये त्याला विशिष्ट अर्थ प्राप्त होतो. काव्यशास्त्रामध्ये शब्दशक्तिविचारात 'संकेतविषयीभूत विशेष गुण' या अर्थी तो येतो. न्यायशास्त्रामध्ये, 'सामान्य कार्योत्पादक विशेष कारण' असा अर्थ त्याला प्राप्त होतो. वेदान्तामध्ये, 'वस्तूचे बाह्य विकारी, अतएव फसवे रूप' या अर्थी तो येतो. (त्याला अनुलक्षूनच 'माया' हाही अर्थ त्याला येतो.) ज्ञानदेवांनी उपर्युक्त ओवीत याच अर्थी तो वापरला आहे.

म्हणूनच 'वस्तूच्या बाह्य विकारी रूपांवर न विसंबता, त्या पलीकडे असलेले जे सर्वगत, अविकारी, अविनाशी चैतन्य, त्याचा स्वीकार तत्त्वज्ञ संत करतात' – असा ज्ञानदेवांचा या संतलक्षणातील अभिप्राय आहे.

संतांची दृष्टी 'विवेकी' म्हणजे आत्मानात्मविचारी, देहबुद्धी व आत्मबुद्धी यांतील भेद जाणून वागणारी असते. देहबुद्धीचे अपत्य जो अहंकार, याच्या अधीन न होणारी असते.

हा संतवृत्तीचा पहिला विशेष.

संत याप्रमाणे देहातीत वृत्तीचे असले, तरी अन्य देहधारी मानवांच्या हितार्थ रोजचे कर्म निरिच्छपणे आचरणारे असतातच. यालाच 'लोकसंग्रहार्थ कर्म' असे म्हटले जाते. या संदर्भात एकनाथांनी भागवतात सांगितलेले दुसरे संतलक्षण पाहता येईल. उद्धवाला उपदेश करताना श्रीकृष्ण म्हणतात,

*अभेदभक्तिवैराग्यज्ञान। स्वयें आचरोनि आपण।*

*देखी लावावे इतर जन। लोकसंग्रह जाण या नाव।। (ए. भा. २९.८१०)*

'देखी लावणे' म्हणजे नैतिक आचरणाचा कित्ता घालून देणे. 'अभेदभक्ती' म्हणजे जीवनातील भिन्न भिन्न वृत्तींच्या माणसांमध्ये भेद न मानता, सर्वांना समान लेखून त्यांच्यावर प्रेम करणे. असे अभेदभजन करणारा जो, तोच खरा भक्त; तो देवालाही प्रिय असतो, असा अभिप्राय नाथांनी सूचित केला आहे.

याप्रमाणे 'संतवृत्ती' ही सर्वगत चैतन्याच्या साक्षात्कारामुळे देहाहंकारापासून मुक्त व सर्वत्र समभाव राखणारी असते.

**कविवृत्ती :** 'कविर्मनीषी परिभू: स्वयंभू:' असे एक लक्षण ईशोपनिषदात मिळते.

'मनीषी' म्हणजे मनाचा अधीश. म्हणूनच,

*'अपारे काव्यसंसारे कविरेकः प्रजापतिः।'*

'परिभू' म्हणजे सर्वव्यापी. या संदर्भात, 'विश्वीं या प्रतिभाबलें विचरतो चोहींकडे लीलया' हे केशवसुतांचे उद्‌गार आठवावे. 'स्वयंभू' म्हणजे जन्मजात प्रतिभावंत वा





अनुक्रमणिका

केवळ स्वतःच्याच अनुभवाचे प्रामाण्य मानणारा.

कविलक्षणसंदर्भात व्याख्यागत शब्दांचे हे स्थूल अर्थ झाले. परंतु संतांच्या बाबतीत या शब्दांचे काही विशेष अर्थही लक्षात घ्यावे लागतात. कारण 'संतकवी' हा समानाधिकरणतत्पुरुष समास आहे. अधिकरण म्हणजे निर्दिष्ट वस्तू. जो संत, तोच कवी. म्हणूनच येथे कविवृत्ती संतवृत्तीने नियंत्रित होते. त्या दृष्टीने 'मनीषी' म्हणजे, ज्याचा आत्मानात्मविवेक जागा आहे. 'परिभू' म्हणजे सर्वगत चैतन्याच्या जाणिवेतून काव्यनिर्मिती करणारा. 'स्वयंभू' म्हणजे अनन्यपरतंत्र परतत्त्वाचा स्पर्श झालेला.

कविवृत्तीच्या संदर्भात कविलक्षणाचे जे दोन पातळयांवरील भिन्न अर्थ लक्षात घेतले, ते उदाहरणांच्या आधारे समजावून घेऊ.

पहिले उदाहरण आहे. मुक्तेश्वराच्या महाभारतातील प्रभातवर्णनाचे. प्रसंग आहे आदिपर्वातील. लाक्षागृहातून सुखरूप बाहेर पडलेले पांडव कुंतीसह रात्रभर वाटचाल करीत होते. भयचिंतेच्या जोडीलाच शारीरिक थकवाही होता. अशा वेळी ती भीषण रात्र संपून पहाट झाली. मुक्तेश्वर वर्णन करतात.

*शेष वेचितां अठरा घटिका। पूर्वदिशेनें क्षाळिले मुखा।*
*कुंकुम रेखिलें त्या टिळका। अरुणोदयो बोलती।।६७।।*
*... हस्त आवरितां कुमुदीं। अवमान मानिला षट्पदीं।*
*त्यातें आदरें कोकनदीं। पाचारिलें जवळिके।।६९।।*
*कुक्कुटें चेइरें करितां काका। भयें पळ सुटला उलूकां।*
*भोग द्यावया चक्रवाकां। चक्रवाकी चालिल्या।।७०।।*
*गाढालिंगनाच्या गांठी। सोडितां दंपत्यें होती कष्टी।*
*वस्त्रें वेढिती परी पोटीं। अपूर्णकामें जळजळ।।७१।।*
*स्वैरिणी सोडुनि सखयांतें। दूतीसहित त्वरें बहुतें।*
*गृहा येऊनि स्वकर्मातें। संपादिती लौकिकीं।।७२।।*
*... घेऊनि अंधकाराची बुंथी। चंद्र स्वेच्छा भोगी राती।*
*प्रकाश वेढूनि सूर्याप्रती। म्हणे मी शुद्ध पतिव्रता।।७५।।*

*(महा. आदि. अ. ३६)*

प्राचीन मराठीमधील, 'पहिले कलाकवी' म्हणून मुक्तेश्वरांचा गौरव केला जातो. त्या संदर्भात त्यांच्या निसर्गसौंदर्य – वर्णनाचा हा नमुनाही उद्धृत केला जातो. परंतु या वर्णनामध्ये कोणते जीवनव्यवहार वर्णिले आहेत? एका भोगातून मुक्त होऊन दुसऱ्यात अडकणारे भ्रमर, भोगाभिमुख चक्रवाक, अपूर्ण कामतृप्तीमुळे जळणारे स्त्रीपुरुष, समाजतिरस्कृत स्वैर भोग घेऊन गरती म्हणून मिरविणाऱ्या स्त्रिया आणि

तशीच ती रात्र सुद्धा चंद्राला भोगून येऊन स्वतःला शुद्ध, पतिव्रता म्हणवून सूर्याला सामोरी जाणारी!

—या वर्णनात कुठे तरी पांडवांच्या भयचिंतेच्या ताणांचा स्पर्श आहे काय? हा केवळ शृंगारसूचक कल्पनाविलास आहे.

आता संतांनी केलेले एक प्रभातवर्णन याच्या जवळच ठेवून लक्षात घेऊ. ज्ञानदेवीच्या सोळाव्या अध्यायाच्या आरंभी गुरुवंदनामध्ये उपमानार्थ आलेले हे वर्णन आहे. सद्गुरुरूपी सूर्य उगवताच काय घडले? ज्ञानदेव लिहितात :

*जो अविद्ये राती रुसौनियां। गिळी ज्ञानअज्ञानाचिया चांदणियां।*
*जो सुदीनु करी ज्ञानियां। स्वबोधाचा ॥२॥*
*जेणें विवलतिये सवले। लाहूनि आत्मज्ञानाचे डोले।*
*सांडीति देहअहंतेचें आंविंसालें। जीवपक्षी॥३॥*
*लिंगदेहकमलाचां। पोटिं वेचतेया चिद्भ्रमराचां।*
*बंदिं मोक्षु जेयाचां। उदैला होये॥४॥*
*शब्दाचिया अशंकडी। भेदनदिचां दोहीं थडीं।*
*अरडांतें विरहवेडी। बुद्धिं बोधीं॥५॥*
*तें याचकाचें मिथुन। समरस्याचें समाधान।*
*भोगवि जो चिद्गगन-। भवनदिवा॥६॥*

येथेही रात्र आहे; पण ती अविद्येची. कमळात अडकलेला भ्रमरही येथे आहे; पण सूर्योदय होताच तो मुक्त होतो. येथेही चक्रवाक आहेत; परंतु ते अद्वैताच्या प्रांतात एकरूप होऊन सुखावणारे.

ही दोन वर्णने तुलनार्थ एकत्र आणून मी मुक्तेश्वरांवर अन्याय तर करीत नाही ना? अशी शंका येण्याचे कारण इतकेच, की पहिले वर्णन प्रस्तुत आहे, तर दुसरे अप्रस्तुत उपमानस्थानी आहे.

हा भेद मान्य करूनही या दोन वर्णनांतील भेदावरून कविवृत्तीच्या दोन पातळ्या लक्षात येतात. समर्थ रामदासांच्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे, पहिली पातळी 'धीटपाठ कवीची', तर दुसरी 'प्रासादिक कवीची.' धीटपाठ कवींचे समर्थकृत वर्णन असे आहे :

*कामिक, रसिक, शृंघारिक। वीर, हास्य, प्रस्ताविक।*
*कौतुक विनोद अनेक। या नांव धीटपाठ॥ (दासबोध १४.३.११)*

थोडक्यात अष्टरसाश्रयी रचना करणारा, तो धीटपाठ कवी. उलट, शांतरसाश्रयी रचना करणारा तो प्रासादिक कवी. त्याचे लक्षण असे :

*जेणें सद्वस्तु भासे। जेणें भास हा निरसे।*





अनुक्रमणिका

*जेणें भिन्नत्व नासे। या नांव कवित्व।। (दासबोध १४.३.५२)*

ज्ञानदेवांनी ज्याला 'उपाधी' म्हटले होते, त्यालाच समर्थ येथे 'भास' म्हणत आहेत. येथील 'सर्वगत चैतन्य' तीच येथील 'सद्‌वस्तू.' या सद्‌वस्तूचा साक्षात्कार म्हणजेच ज्ञानदेवांचा 'परतत्त्वस्पर्श.' तेव्हा धीटपाठ कवी हा लौकिकात रमतो, तर प्रासादिक कवी हा लौकिकातून अलौकिकाकडे जातो असे म्हणायला हरकत नाही. उपर्युक्त उदाहरणे एवढाच भेद लक्षात घेण्यापुरती आहेत.

यावरून 'संतकवी' या सामासिक शब्दाचे सामानाधिकरण्यही लक्षात येईल.

**३.३) पंतवृत्ती :** वामनपंडितांपासून मोरोपंतांपर्यंतचे पंडितकवी हे अभिजनांच्या अभिरुचीचे पोषण करणारे. कारण त्यांची स्वतःची अभिरुची संस्कृत महाकाव्यांच्या परिशीलनातून तयार झालेली. त्यांच्या रचनांना 'विदग्ध काव्य' असेही नाव दिले जाते. विदग्ध म्हणजे नागर अभिरुचीचा रसिक विद्वान. रचनासौष्ठव, वृत्तसुभगता, शब्दसौंदर्य यांची या विदग्धांना विशेष आवड; ती या पंतांनी पुरविली. त्यांचे काव्य संतांप्रमाणेच रामकृष्णांच्या कथा सांगणारे असले, तरी त्यांची रचना स्वतःकडेच कौतुकाने पाहणारी. त्यामुळे या काव्यात रसपूर्णता असली, तरी मधूनच येणाऱ्या शब्दांच्या कसरती विदग्धांची टाळी मिळविणाऱ्या; परंतु अन्यजनांना दुर्बोध वाटणाऱ्या असणार! मोरोपंतांसारखे रससिद्ध कवी देखील या शाब्दिक कसरतीच्या आहारी कसे जातात; याचे एकच उदाहरण येथे नोंदू.

प्रसंग आहे आर्याभारताच्या उद्योगपर्वातील. श्रीकृष्णाची शिष्टाई फुकट गेली व कौरव–पांडवांचे युद्ध होणार, हे जवळ जवळ निश्चित झाले. अशा वेळी कुंती कर्णाची भेट घेऊन त्याला आपल्याकडे वळविण्याचा प्रयत्न करते. मायलेकरांचा नातेसंबंध प्रत्यक्ष कुंतीच्या तोंडून कर्णाला प्रथमच कळतो आहे. अशा वेळी कुंती काय म्हणेल?

पंत लिहितात,

*कुंती कर्णासी म्हणे, "वत्सा! कौंतेय तूं, न राधेय;*<br>
*'राधे!' यथेष्ट म्हण, परि कर्णा! कर्णासी फार बाधे 'य.'*<br>
*हे मात्र न ऐकवती, सुखद मला मनुदुमिलित रा धे य;*<br>
*कानीन पुत्र माझा, कर्णा! कौंतेय तूं, न राधेय. "*

*(उद्योग. ११. ९ व १०)*

पंतांची कुंती म्हणते आहे,

"बाळा, तू कौंतेय – माझा मुलगा आहेस. (अधिरथपत्नी) राधा हिचा मुलगा नाहीस. तू केवळ 'राधे' म्हण; पण त्यापुढचा 'य' माझ्या कानाला पीडा देतो. 'मनुदु' यांच्याशी (अनुक्रमे) मिळणारे रा, धे, य - (म्हणजे राम, धेनु व यदु) हे शब्द मला एक वेळ ऐकवतील; परंतु 'राधेय' हे तुझे संबोधन मला ऐकवत नाही."

पहिल्या आर्येत अंत्ययमकाबरोबर दामयमक साधण्याचा खटाटोप आहे. दुसऱ्या आर्येतील अक्षरांची जुळवाजुळव कसरतीपलीकडे काय दाखविते? कुंती मनातील भावनांच्या कल्लोळाचा अल्पसा देखील स्पर्श या शब्दांना नाही.

पंतवृत्ती ही अशा प्रकारच्या रचनाचमत्कृतीमध्ये अधिक रमते.

संतांच्या काव्यात अशा शाब्दिक कोट्या नसतात का?

एकनाथांसारखा कवी अशा शाब्दिक गमती क्वचित करतो. परंतु त्यांचे प्रयोजन वेगळे असते.

भावार्थरामायणातील एक प्रसंग उदाहरण म्हणून घेऊ.

रावणाने सीतेचे अपहरण केल्यानंतर तिच्यासाठी वेडा झालेला राम वृक्षपाषाणांना मिठ्या मारीत हिंडत होता. हे पाहून पार्वतीने शंकराला विचारले,

'हेच का तुमचे परब्रह्म? एखाद्या पामरासारखे ते बायकोसाठी असे वेडे काय झाले?'

नंतर पार्वती रामाची परीक्षा पाहण्यासाठी सीतेच्या रूपाने आली. रामाने तिच्याकडे लक्षच दिले नाही. हे पाहून लक्ष्मणाला आश्चर्य वाटले. ऋषिमुनीही नवल करू लागले. सीतारूपी पार्वती पुन्हा पुन्हा रामापुढे येतच होती. शेवटी राम म्हणतो,

'तू का आई?'

एकनाथ लिहितात,

*'श्रीराम म्हणे तूं काई। तेंचि नाम लोकांच्या ठायीं।*

*अद्यापि राहिलेंसें पाहीं। म्हणती तुकाई जगदंबा।।*

*तुकाई नामें नामाभिधान। तें जगदंबेचें निजस्थान।*

*अद्यापि पूजिती जन। अति पावन दंडकारण्यीं।।'*

*(भा. रा. अरण्य. २०.६४ व ६५)*

'तू का आई?' म्हणून 'ही तुकाई' ही नाथांची कोटी शाब्दिक कसरतीचीच. परंतु ती साधून नाथांनी तुकाई-जगदंबा हे लोकदैवत रामकथेशी जोडून टाकले. रामकथेचे सनातनत्व श्रोतृमनी बिंबवले. अन्य देवतांहून असलेले रामाचे श्रेष्ठत्वही सूचित केले.

एकनाथ एवढ्यावरच थांबत नाहीत. यानंतर पार्वती जेव्हा रामांना त्यांच्या शोकाविर्भावाचे रहस्य विचारते. तेव्हा राम सांगतात,

'या वृक्षपाषाणांना आलिंगन देऊन मी त्यांचा उद्धार केला. कारण ते दीर्घकाळ अनुष्ठान करीत उभे असलेले ऋषी होते. त्यांच्या निरभिमान भक्तीमुळे मी त्यांना प्रेमालिंगन दिले.'

'सर्वांभूती भगवंत' ही शिकवणही नाथ येथे देतात.

अशा प्रकारे संतांचे शब्दानुवर्ती विषयांतरही शेवटी त्यांच्या कथार्थाला भावित करणारे असते.

संतवृत्ती व पंतवृत्ती यांतील भेद या उदाहरणावरून लक्षात येईल.

३.४) **व्यासवृत्ती** : शेवटी या वृत्तीचे काही विशेष लक्षात घेऊ. व्यास हे महाभारताचे कर्ते. त्यांना 'व्यास' का म्हणतात? कारण त्यांनी वेदांचे विभाग केले. हा झाला एक अर्थ.

'व्यास' या शब्दाचा दुसरा अर्थ आहे, 'विस्तार.' पुराणिक हा कथा सांगताना या वृत्तीतून बोलतो. कथेला उपकथेची, प्रसंगाला बोधाची, घटनेला पारंपरिक श्रद्धेची जोड देत देत त्याचे विवेचन विस्तार पावते. नाथांचे 'भावार्थ रामायण' हे व्यासवृत्तीचे उदाहरण आहे.

परंतु येथेही व्यासवृत्तीच्या दोन पातळ्या लक्षात येतात. नाथांच्या व्यासवृत्तीला संतवृत्तीची अट आहे. पण श्रीधरासारखे पुराणिक कवी बोधाच्या नावाखाली जो विस्तार करतात, तो अखेर श्रोत्यांच्या भाबड्या समजुतींना खतपाणी घालणारा असतो. बोधाची ही पातळी पारंपरिक श्रद्धा, पावित्र्यश्रेणी, वर्णनिष्ठा, व्रतवैकल्यांची फलश्रुती, पावित्र्यकल्पना यांसाख्या समाजमनात रूढ असलेल्या गोष्टींचीच भलावण करून सामान्य श्रोत्यांकडून भाबडेपणाची टाळी मिळविणारी असते.

याउलट, संतकवी हे परंपरेतील जे अयोग्य, अनीतिकारक, मानव्याचा अपहार करणारे असेल, त्याला छेद देऊन श्रोत्यांना शुद्ध आध्यात्मिकतेकडे वळवितात.

श्रीधरस्वामी व एकनाथ यांच्या ब्राह्मणवर्णाकडे पाहण्याच्या दृष्टीची उदाहरणे घेऊन हा भेद लक्षात घेऊ.

३.४.१ श्रीधरस्वामींच्या 'शिवलीलामृता'त एक प्रसंग आहे. दहाव्या अध्यायात शारदेची कथा येते. ती बालविधवा होती. पित्याकडे राहत असताना तेथे एक दिवस नैध्रुव नावाचे अंध मुनी आले. शारदेने केलेल्या सेवेमुळे संतुष्ट होऊन त्यांनी तिला पुत्रप्राप्तीचा आशीर्वाद दिला. नंतर, ती विधवा आहे, हे कळल्यानंतर ते म्हणाले,

'माझे वचन खोटे ठरणार नाही. तू उमामहेश्वराचे व्रत कर. तुझा पती परत येईल.'

ज्या स्कंदपुराणाच्या ब्रह्मोत्तरखंडातून श्रीधरांनी ही कथा घेतली आहे, तिथे एवढाच भाग आहे.

श्रीधरस्वामी मात्र स्वकालीन श्रोत्यांना ही कथा सांगताना म्हणतात,

'नैध्रुव हे ब्राह्मण; तेव्हा त्यांचा शब्द खोटा कसा पडणार?'

आपले हे सिद्धान्तवचन पुराणातील उदाहरणांनी मंडित करताना ते म्हणतात,

*विप्रशापाची नवलगती। साठसहस्र सगर जळती।*

*कुबेरपुत्र वृक्ष होती। नारदशापें करोनियां।।*

*कृष्णासहित यादवकुळ। ब्रह्मशापें भस्म झालें सकळ।*

*दंडकाऐसा नृपाळ। क्षणमात्रें दग्ध केला।।*

*ब्रह्मशाप परमदृढ। नृगराज केला सरड।*

*धराधरशत्रु बळप्रचंड। सहस्रभगें त्या अंगीं।। इ. इ.*

*... पाषाणाचे करिती देव। रंकाचेही करिती राव।*

*मंत्राक्षता टाकितां नवपल्लव। कोरड्या काष्ठा फुटेल कीं।।*

*ब्राह्मण थोर जगतीं। हे ब्रह्मांड मोडोनि पुन्हा घडती।.... (१०.२८ ते ३३)*

अशा प्रकारे स्वकालोचित समजुतींची पुटे आपल्या श्रोत्यांच्या मनांवर चढवीत चढवीत स्वामींचे कथन पुढे सरकते.

३.४.२ या उलट, भावार्थ रामायणात जेथे जेथे ब्राह्मणांचा संबंध वा उल्लेख येतो, तेथे तेथे एकनाथ त्यांचे अर्थशून्य वेदपठन, पोकळ शब्दज्ञान, भावशून्य कर्मकांड, अहंकार व लोभीवृत्ती यांचे दर्शन घडवून समाजमनात स्थिर झालेल्या पारंपरिक जन्मनिष्ठ वर्णश्रेणीला धक्का देतात.

भावार्थरामायणातील एकाच साध्या प्रसंगाचे उदाहरण घेऊ.

प्रसंग आहे अयोध्याकांडातील. वनवासाला निघालेल्या रामाला भेटण्यासाठी भरत चित्रकूटाकडे आला. वाटेत त्रिवेणी तीर्थावर त्याने दशरथाच्या श्राद्धाप्रीत्यर्थ ब्राह्मणांना दक्षिणा देऊन संतुष्ट केले. त्या प्रसंगाचे वर्णन करताना नाथांनी तेथील ब्राह्मणांचा एक संवाद उल्लेखून त्यांच्या लोभीवृत्तीवर प्रकाश टाकला आहे.

नाथ लिहितात,

*तीर्थींचे ब्राह्मण लोलुप बहुत। वल्कलधारी श्रीरघुनाथ।*

*द्रव्य वांटील हा राजसुत। असेल गुप्त धन यापासीं।।*

*अतिसमर्थ श्रीरघुपती। वना न वचे रित्या हातीं।*

*द्रव्य वांटील हा तीर्थीं। द्रव्य लोभार्थी ब्राह्मण।।*

*जेथवरी द्रव्यदाराअभिमान। जेथवरी ज्ञानगर्व गहन।*

*त्यासी श्रीरामाचें महिमान। स्वप्नीही जाण लक्षेना।। (अयोध्या. १३. १२ ते १४)*

सर्वगत चैतन्याचा वेध, सर्वांभूती भगवंत ही भावना व तदनुसारी अभेदशक्ती या आरंभी नोंदलेल्या संतवृत्तीच्या लक्षणांनी नियंत्रित झालेल्या अन्य वृत्तींमुळे संतांच्या कथनाला मिळणारे वेगळे वळण येथवर थोडक्यात लक्षात घेतले.

आता 'कथन' ही संकल्पना लक्षात घेऊ.





अनुक्रमणिका

## (४) 'कथना' चे स्थूल घटक :

कथनसरणीचे स्पष्टीकरण देताना महत्त्वाचे चार घटक सांगितले जातात.

घटना, व्यक्ती, अवकाश व भाष्य.

दोन कालबिंदूंमध्ये घडलेल्या घटनांचे कथन कथेमध्ये असते. ते करताना त्यांची संरचना ही अर्थातच कथकाच्या कौशल्यावर अवलंबून असते.

या घटनांच्या मागे आहे माणूस, त्याचे मन, त्याचे भावविश्व. परंतु कथक हा कथार्थाला अनुसरून त्याची एक व्यक्तिप्रतिमा तयार करतो.

अवकाश म्हणजे घटनांच्या पार्श्वभूमीचे दिक्कालबद्ध वातावरण – जे घटना व व्यक्ती यांना कथार्थानुसार नियंत्रित करते.

आणि भाष्य म्हणजे कथकाने विशिष्ट कथामूल्यानुसार केलेले विवेचन.

कथनमीमांसकांचे हे विचारऋण कृतज्ञतापूर्वक स्वीकारून संतसाहित्याच्या संदर्भात त्याचे कार्यकारी स्वरूप लक्षात घेऊ.

विवेचनाच्या सोयीसाठी (४.१) अवकाशबद्ध घटना व (४.२) भाष्यसूचक व्यक्तिप्रतिमा अशा दोन भागांत काही उदाहरणांच्या साहाय्याने हे स्वरूप आता मांडून पाहू.

**(४.१) अवकाशबद्ध घटना :** या घटकाचे स्वरूप पाहण्यासाठी दोन उदाहरणे घ्यावयाची आहेत.

(४.१.१) हे उदाहरण आहे नामदेवांच्या श्रीकृष्णचरित्रातील. नामदेव श्रीकृष्णाचे चरित्र सांगतात, ते प्रायः भागवताच्या आधारे. परंतु मध्येच एखादी घटना स्वकालबद्ध वातावरणाने ते बांधून घेतात. 'नंद-चंपाषष्ठी-नेम' या प्रकरणात त्यांनी असे कल्पिले आहे, की नंदाच्या घरी मार्तंडाची पूजा असते. स्वाभाविकच नैवेद्यासाठी यशोदा विविध पक्वान्ने व रोडगा-भरीतही करते. वाघ्या-मुरळीला बोलावणे धाडण्यात येते. इकडे कृष्णाला लागते भूक.

यशोदा म्हणते,

'जरा थांब, रे, गोविंदा. नैवेद्य होऊ दे.'

पण श्रीकृष्ण काही थांबायला तयार नसतो. तो देवापुढे ठेवलेला नैवेद्य खाऊन टाकतो. यशोदा रागावते; म्हणते,

'आता तुला मार्तंड पछाडणार.'

मग श्रीकृष्ण देखील मुद्दामच वेडे चाळे करू लागतो. मग मात्र यशोदा घाबरते. देवऋषी बोलावले जातात. अंगारेधुपारे होतात. सुपे हालविली जातात. पण काहीच उपयोग होत नाही. यशोदा काळजीने मूर्च्छित होते. शेवटी 'पोरपिसी' होऊन म्हणते,

'कृष्णार्पणमस्तु' आणि सारे विघ्न तात्काळ दूर होते. नामदेव लिहितात,

*नामा म्हणे पाहे कृपादृष्टी।*

*जाणवलें पोटीं हाचि देव।।८१।।*

'यशोदा संकष्टचतुर्थीव्रत' या प्रकरणातही नामदेवांनी याच पद्धतीने गणपतीहून श्रेष्ठ असलेल्या श्रीकृष्णाची प्रचीती घडविली आहे.

या घटनांना अवकाश मिळाला आहे, तो कविकालीन. कशासाठी तो दिला? नामदेवांना श्रीकृष्णचरित्राचा जो कथार्थ व्यक्त करावयाचा आहे, तद्नुसार सर्व लोकदेवतांपेक्षा श्रीकृष्णभक्तीचे महत्त्व श्रोतृमनावर बिंबवायचे आहे.

अनेक देवता, त्यांचे नवससायास या सकाम भक्तीपासून सामान्य जनांना दूर नेऊन श्रीकृष्ण वा विठ्ठल या एकतत्त्वाच्या निष्काम, कर्मयोगप्रधान भक्तीकडे त्यांना नेणे हे संतांचे एक महत्त्वाचे उद्‌बोधनसूत्र आहे.

या संदर्भात तुकारामांचा एक अभंग उद्‌धृत करण्याजोगा आहे.

*नव्हे जाखाई जोखाई। मायराणी मेसाबाई।।*

*बळिया माझा पंढरीराव। जो या देवांचाही देव।।*

*रंडी चंडी शक्ती। मद्यमांसातें भक्षिती।।*

*बहिरव खंडेराव। रोटीसुटीसाठीं देव।।*

*गणोबा विक्राळ। लाडुमोदकांचा काळ।।*

*मुंज्या म्हैसासुरें। हें तों कोण लेखी पोरें।।*

*वेताळें फेताळें। जळो त्यांचे तोंड काळें।।*

*तुका म्हणे चित्तीं। धरा रखुमाईचा पती।। (२३८४)*

(४.१.२) दुसरे उदाहरण आहे एकनाथांच्या 'रुक्मिणीस्वयंवरा' तील.

श्रीकृष्ण–रुक्मिणी विवाहाची कथा भागवतातीलच. परंतु तेथे मुळात प्रत्यक्ष विवाहसोहळयाचे वर्णन नाही. नाथ ते तपशीलवार करतात. विवाहानंतर वरात द्वारकेत प्रवेश करते. स्वाभाविकच वधूवरांना पाहण्यासाठी लोक रस्त्याच्या दुतर्फा गर्दी करतात. या गर्दीमध्ये एका दंडधारी संन्याशाला एका वेश्येचा धक्का लागतो. त्यामुळे संतापून जाऊन तो तिला दंडाने ठोकतो. लाथा घालून म्हणतो,

'विटाळ आम्हांसी का केला?'

या प्रकाराचे त्या वेश्येला हसूच येते. ती म्हणते,

'हाती दंड घेतला आहेस, पण अजून तुझा क्रोध शिल्लकच आहे. तुम्ही कसले संन्यासी? मी उत्तम, अन्य हीन ही विषमता ज्याच्याजवळ असते, तो अज्ञानी. सर्वांभूती

समान तत्त्व आहे, हे ज्याने जाणले, तोच खरा ज्ञानी. भगवी वस्त्रे नेसलात; पण अजून तुम्हांला निजशांती प्राप्त झालेली नाही. शेंडी उपटलीत; पण अजून वासना नष्ट झालेली नाही. श्रीकृष्णाला पाहूनही जो विटाळ मानतो तो जात्यंधच म्हणायला हवा.'

(रु. स्व. प्रसंग १८. २८ ते ३१)

'अभेदभक्ति – वैराग्य – ज्ञान' हे संतवृत्तीचे लक्षण येथे आठवावे. या दोन उदाहरणांवरून अवकाशबद्ध घटनांच्या निवेदनातून संतसाहित्यातील कथन कथार्थसूचन कसे करते, हे लक्षात येईल.

**४.२) भाष्यसूचक व्यक्तिप्रतिमा**

या संदर्भातही दोन उदाहरणे पाहू.

(४.२.१) पहिले उदाहरण आहे एकनाथांच्या भावार्थरामायणातील. या ग्रंथात नाथांनी एक रूपक योजले आहे. तदनुसार रावण हा देहबुद्धीतून निर्माण होणाऱ्या अहंकाराचे प्रतीक आहे, तर मारुती हा आत्मबुद्धिसाधक निरहंकारी भक्त आहे. नाथांचे भाष्य या भूमिकेतून चालू असते.

या दृष्टीने मारुतीची व्यक्तिप्रतिमा रेखाटताना त्यांनी केलेला एक निर्देश उदाहरण म्हणून नोंदू.

सीतेचा शोध घेण्यासाठी मारुती लंकेमध्ये गेला. तेथे त्याने रावणाला त्रस्त केले. लंका जाळली. असा पराक्रम गाजवून तो परत आला. आता ही सर्व हकीगत रामाला सांगावयाची होती. नाथ लिहितात,

'पण हे सर्व तो स्वतःच्या तोंडाने कसे सांगणार? कारण स्वतःची कीर्ती स्वतःच्या तोंडाने सांगणे, हे अहंकाराचे द्योतक. म्हणून ब्रह्मदेवाकडून पत्र लिहवून त्याने हे रामाला कळविले.'(सुंदर २६.२०)

इथे ध्यानात घ्यावयाची एक गोष्ट अशी, की ब्रह्मदेवाकडून पत्र लिहवून रामाला स्वपराक्रम कळविण्याची ही घटना मूळ वाल्मीकीरामायणामध्ये नाही. ती नाथांनी कदाचित आनंदरामायणातून घेतली असावी. मात्र तेथून ती घेऊन त्यांनी आपल्या रामकथेतील व्यक्तिचित्रण भाष्यानुसारी केले.

(४.२.२) दुसरे उदाहरण आहे समर्थांच्या द्विकाण्डात्मक रामायणातील. याच्या अखेरीस येणारी भरताची व्यक्तिप्रतिमा अशीच भाष्यानुसारी आहे. समर्थांच्या रामायणाच्या कथार्थही नाथांनाच अनुसरणारा आहे. म्हणून भरत हा निरहंकारी, निर्मम कर्मयोग्याचे प्रतीक आहे.

राम लंकेहून परतले. त्यांनी मारुतीला पुढे धाडले कशासाठी? तर, राजपद सोडण्याची भरताची तयारी आहे, की नाही, हे जाणून घेण्यासाठी.

भरत मात्र मारुतीच्या भेटीने आनंदित झाला, तो म्हणाला,

'केव्हा एकदा हे राज्य रामाकडे सोपवितो, असे मला झाले आहे.'

कां? तर -

*पदें भोगितां त्या मदें बाधिजेतें।*
*दिसेंदीस आयुष्य तें व्यर्थ जातें।।*
*...म्हणोनि मला राघवेंवीण कांहीं।*
*सदासर्वदा वैभवीं चाड नाहीं।। (युद्ध.११. ६७ व ७०)*

सत्ता, वैभव यांमुळे उन्मत्तपणा येतो, वृत्ती अहंकारी होते, म्हणून भरताला राजपद नको आहे. तो आनंदाने राजसत्ता सोडतो.

भरताची ही व्यक्तिप्रतिमा संतवृत्तीने कशी नियंत्रित केलेली आहे, हे सहज लक्षात येईल.

**५. समारोप :**

संतवृत्तीच्या संदर्भात कथनसरणीचे घटक कोणत्या रीतीने कार्यकर होतात, हे येथे स्थूलपणे मांडून पाहिले आहे.

वस्तुतः या घटकांचे स्वरूप अधिक गुंतागुंतीचे आहे; त्यांना अनेक परिमाणे आहेत. कवीच्या कुवतीनुसार व कथार्थाच्या मागणीनुसार या घटकांचे वेगवेगळ्या पातळ्यांवर विलयनही होत असते, याची मला जाणीव आहे; आणि शेवटी कवीच्या प्रतिभेला अशा चौकटीत बंदिस्त कशी करणार?

म्हणूनच येथे संतसाहित्याच्या संदर्भात कथनसरणीच्या घटकांची एक दिशा लक्षात घेण्याचा एक नम्र प्रयत्न केला आहे.

प्रस्तुत लेख पुणे विद्यापीठ - मराठी विभाग व गीता - धर्म - मंडळ, पुणे ३०, यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित कै. डॉ. रघुनाथराव राक्षे व्याख्यानमालेत ता. २२ मार्च, १९९५ रोजी दिलेल्या पहिल्या व्याख्यानावर आधारित आहे.

या विषयाचा विचार करताना पुढील लेखकांच्या काही विचारांचा व दाखल्यांचा उपयोग झाला, हे कृतज्ञतापूर्वक नमूद करतो :

१. कै. प्रा. न. र. फाटक - श्री एकनाथ : वाङ्मय आणि कार्य - दु. आ., १९६३

२. श्री. रा. चिं. ढेरे - महाराष्ट्राचा देव्हारा, १९७८

३. प्रा. गंगाधर पाटील - कथनमीमांसा - 'अनुष्टुभ', दिवाळी अंक, १९९१

**मु. पो. चौल, ता. अलिबाग, जि. रायगड ४०२२०३.**

○○○

भाषानिरीक्षण

# शब्दांच्या गावा जावे!

नीलिमा गुंडी

अभ्यास करताना नवे शब्द ग्रहण करण्याची मुलीची पद्धत पाहणे, हा अनुभव मोठा मजेशीर आहे.

भूगोलाच्या परीक्षेचा आदला दिवस होता. पुणे जिल्ह्यासंबंधीचे अनेक भौगोलिक तपशील तिसरीच्या मुलांनी डोक्यात खचून भरावेत, अशा अपेक्षेने त्यांना पुस्तकात माहिती दिलेली आहे. जिल्ह्यातल्या नद्या, धरणे, तलाव, बंधारे, वने, इ. ची नावे लक्षात ठेवणे हे अगदी जिकिरीचे काम होते. अनेक खनिजांची नावेही अवघड होती.

नियमित अभ्यास न केल्यामुळे मनाची कोरी पाटी घेऊन मुलगी अभ्यासाला समोर बसली. त्याविषयी मला आधीच राग आलेला होता. त्यात आमचा संवाद (!) सुरू झाला, तो असा :

''दौंड तालुक्यात वरवंड, कासुर्डी आणि मोटोबा, हे तीन तलाव आहेत. यांतलं एक तरी नाव राहील का लक्षात?'' इति मी!

मुलगी शांतपणे म्हणाली,

''हो! मी 'पोटोबा' लक्षात ठेवीन, म्हणजे 'मोटोबा' आठवेल!''

(नशीब माझं! ''मी वरवंटा लक्षात ठेवीन, म्हणजे वरवंड आठवेल'', असं नाही म्हणाली!'')

मग खनिजांची नावे पाठ करायची वेळ आली. 'बॉक्साइट' नाव उच्चारताच हिचं सुरू,

''आई, मी 'बॉक्स' लक्षात ठेवीन!''

मग 'ॲल्युमिनियम' ची वेळ आल्यावर उत्तर तयार -

''हं! मी चिंटूची मैत्रीण 'मिनि' लक्षात ठेवीन!''

(चिंटू हे 'सकाळ' दैनिकातल्या व्यंग्यचित्रमालेतील बालकप्रिय पात्र)

'बांगडा आणि पापलेट' ही मांशांची नावे आल्यावर उत्तर आलं,

"मी बांगडी आणि पापड लक्षात ठेवीन!"

हा सगळा प्रकार मला राग आणत होता आणि ही तर पठ्ठी आत्मविश्वासानं बोलत होती!

एखादा शब्द जसाच्या तसा लक्षात न ठेवता, इतक्या लांब जाऊन त्याच्याकडे परत येण्याचा हा काय खेळ चाललाय्! या प्रकारात दिशाभूल होऊन आडवाटेला जाण्याचा धोकाच जास्त होता!

पण एका बाजूनं तिचेंही बरोबरच होतं. ज्या शब्दाच्या अर्थाचं कोणत्याही संदर्भात भान आलेले नाही– असे निखळ, कोरडे शब्द कसे लक्षात ठेवणार? त्यासाठी हा तिचा शब्दापासून शब्दापर्यंतचा प्रवास चालू होता!

तसं पाहिलं, तर साहित्यात तरी प्रत्यक्ष आशयाला भिडण्याचा मार्ग किती जण पत्करतात? कोणी रूपकांच्या वाटेने, कोणी दृष्टांताच्या, तर कोणी विशेषणांच्या वाटेने आपल्याला आशयापर्यंत नेऊ पाहत असतात! सगळे अलंकार हे एक प्रकारे शब्दांच्या जवळ पोहोचवण्यासाठी आधी थोडे लांब जाण्याचा मार्गच नाही का अनुसरत? त्या वाटेने सगळेच मुक्कामाला पोहोचू शकत नाहीत, हे खरं! पण..

माझी ही भीती मी मनातच ठेवली आणि तिला तिच्या या प्रवासाला मनातल्या मनात शुभेच्छा देत, तिच्या खेळात सामील होत म्हटलं,

"हं, मुक्ता, 'मँगनीज' हे खनिजाचं नाव आहे. 'मँगोला' लक्षात ठेव, म्हणजे आठवेल."

तिनेही ताबडतोब हसून मान डोलावली.

**स. प. महाविद्यालय, मराठी विभाग, पुणे ३०.**

○○○

# आजचे वास्तव

विजया देव

'चौकमंडी या घाऊक भाजीबाजारात भाज्यांचा आणि रक्ताचा सडा पडला होता.'

हिंसाचार हा आशय असलेल्या एखाद्या साहित्यकृतीतील हे विधान आहे, असे समजू. साहित्यसमीक्षक या वाक्याकडे भाषिक दृष्टिकोनातून कसे पाहील ? तो, साहित्य ही शाब्दकला असल्याने लेखक भाषिक द्रव्याचा कसा कलात्मक वापर करतो, व्याकरणिक नियमोल्लंघनाने कसे सौंदर्य साधतो, हा मुद्दा स्पष्ट करील.

उभयान्वयी अव्ययाने कोणती नामे एकत्र यावीत, याचा भाषकाच्या मनात असलेला संकेत येथे कसा धुडकावून लावला आहे व भाषेच्या वक्र वापराने जळजळीत वास्तव उभे केले आहे, हे सांगेल.

हे वाक्य साहित्यकृतीत भेटले असते, तर सगळे फार सोपे होते. पण दुर्दैवाने हे वाक्य कोणत्याही ललित साहित्यकृतीतील नाही, तर अतिरेक्यांच्या कारवायांचा वृत्तपत्रीय वृत्तांत आहे. टाइम्स ऑव्ह इंडियाच्या (मंगळवार, एकवीस जून, एकोणीसशे अठ्याऐंशी) बातमीतील हे वाक्य आहे.

आजचे वास्तवच कसे जळजळीत व विषण्ण करणारे आहे, याचे हे बोलके उदाहरण आहे. रसरशीत, जीवनदायी भाज्या आणि जीवघेणा रक्ताचा सडा या परस्परविरुद्ध गोष्टींचा मिलाफ एका थंड वाक्यात व्हावा, इतकं वास्तव आज हिंसाचारमय बनलेलं आहे.

पश्चिम दिल्लीत झालेल्या बॉंबस्फोटाचे वर्णन करताना बातमीदार म्हणतो,

"...The chaukmandi wholesale vegetable market was littered with vegetables and pools of blood."

उग्र वास्तवाचं हे शब्दरूप वाचून मी शहारले. नंतर दिवसभरात कुठल्याही बातम्या, घटना आतपर्यंत पोहोचू शकल्या नाहीत. धगधगता पंजाब आणि अतिरेकी





अनुक्रमणिका

कारवाया यांच्याबद्दलच्या बातम्यांना नजर सरावली होती, मन बधिर झाले होते; पण या वाक्याने, नकळत काटा रुतून जिव्हारी कळ यावी, तसे झाले. निरपराध जीवन-रहाटी आणि सशस्त्र दहशतवाद यांच्यांत सरशी कोणाची होणार, हे काय सांगायला पाहिजे? सगळेच प्रश्न फार गुंतागुंतीचे आहेत आणि दुर्दैवाने हे साहित्यकृतीतील वाक्य नव्हे.

**६१/१६, एरंडवणे, इन्कम–टॅक्स ऑफिसजवळ, पुणे ४११ ००४.**

○○○



अनुक्रमणिका

# नाविक हाल

**नानासाहेब टिळक**

माझे एक ज्येष्ठ मित्र श्री. वि.अ. तथा तात्यासाहेब तेंब्रे ह्यांनी दै. गावकरीत नुकताच एक लेख 'नाविक हालां' वर लिहिला आहे. प्रा. झाद ह्या रशियन प्राध्यापकांचे नाव जवळ जवळ प्रत्येक वृत्तपत्राने वेगवेगळे छापून, इंग्लंडमध्ये आश्रय घेणाऱ्या त्या रशियन महाभागाचे खरोखरच 'नाविक हाल' केले आहेत. मला तात्यासाहेबांचा लेख मनापासून आवडला. एखाद्याच्या 'नाविक' हालांबद्दल सहानुभूती दाखविणारा कदाचित तो मराठीतला पहिलाच लेख ठरेल. त्या लेखाने जागृत व विचारवंत होत्साता मी कठोर दृष्टीने आत्मसंशोधन करू लागलो. तो हाय हाय! मीच एकटा नव्हे, तर कदाचित आपण सर्वच ह्या पापांचे वाटेकरी ठरत असल्याचे मला दिसून आले. आपण केवळ एखाद्याचेच नाविक हाल करतो, असे नाही. आपल्या हातून कित्येकांचा नाविक छळ होत असतो. कोणत्याही थोर माणसाला आपल्या ह्या छळाची झळ पोहोचू शकते. भारताचे राष्ट्रपतीही त्यातून सुटत नाहीत.

भारताच्या राष्ट्रपतींचे–प्रेसिडेंटचे नाव – आपण सर्रास डॉ. झकीर हुसेन म्हणून लिहितो, छापतो, वाचतो. पण त्यांचे नाव झकीर नाही. ते आहे जाकीर. 'जाकिर' म्हणजे 'जिक्र' करणारा. 'जिक्र' म्हणजे मराठी 'जिकीर' नाही. 'जिक्र' या शब्दाला बरोबर प्रतिशब्द मराठीत नाही. काही चांगली गोष्ट खुलासेवार समजावणारा, उपदेशपर सांगणारा असा काहीसा याचा अर्थ होईल. खरे म्हणाल, तर त्यांचे नाव सध्याच्या बालबोध मराठी लिपीत लिहिणे कठीणच आहे. कारण त्या 'जाकीर' मधला 'ज' हा जहाजातला 'ज' नाही, जपानमधलाही 'ज' नाही. त्याचा उच्चार 'ज' आणि 'झ' ह्या मधला आहे. तो व्यक्त करणारे मराठी किंवा इंग्रजी अक्षर प्रचारात नाही, तेव्हा राष्ट्रपतींचे नाविक हाल सहज टाळता येतील, असे नाही.

ही नाविक हालाची झळ फार मोठमोठ्या लोकांना फार प्राचीन काळापासून पोहोचत आहे. जगातील एक सर्वश्रेष्ठ विद्वान 'ॲरिस्टॉटल' याचे नाव आपल्या हिंदी भाषिक भावांनी केव्हाच 'अरस्तु' केले आहे; आणि महान तत्त्वज्ञ आणि हुतात्मा सॉक्रेटीस याचे नाव झाले आहे 'सुकरात' आणि त्याचा शिष्य प्लेटो याला तर चक्क

'अफलातून' करून टाकला आहे. सॉक्रेटिसाला साक्रतु करण्याचे सत्कृत्य एका प्रसिद्ध मराठी कवीनेही केले आहे. विषाच्या गोडीचे वर्णन करताना कवी बा.भ.बोरकरांनी म्हटले आहे.

'ह्याची रुची । कुणी विरळा जाणे

सुकृती साक्रतु किंवा

मीरा दर्द दिवाणी'

मला ह्या काव्यपंक्ती आवडल्या; आणि म्हणूनच लक्षातही राहिल्या. पण हा 'सुकृती साक्रतु' म्हणजेच सॉक्रेटीस हे समजले, तेव्हाच! ॲलेक्झांडरचे शिकंदर करून आपणही हिंदीच्या बाजूचे आहोत, हे आपण मागेच सिद्ध केले आहे.

इंग्रजांचाही आपण काही कमी नाविक छळ केला नाही. 'एल्फिन्स्टन' चा आपण केला 'आलपिष्टन', ज. वेलस्लीचा केला वेसलीसाहेब. बिचाऱ्या कॅप्टन स्टुअर्टचे 'फाकडो' म्हणून कौतुक केले, पण त्याच्या 'स्टुअर्ट' ह्या नावाचे 'इष्टूर' करून टाकले, त्या 'इष्टूर' फाकड्याचा नाविक छळ अजूनही थांबला नाही. (मॅक्स म्युलरचे आपण मोक्ष मुल्लर करून केव्हाच मोकळे झालो आहोत! पण ते गृहस्थ इंग्रज नव्हते.)

इंग्रजांनीही त्यांचे राज्य येताच या 'नाविक' छळाचे उट्टे काढले. त्यांनी मराठ्यांच्या अखेरच्या युद्धभूमीच्या परिसरातील 'खडकी'चे केले 'किर्की' आणि 'घोरपडी'चे 'घोरपरी!' बडोद्याचे 'बरोडा', 'खंबायत' चे 'कँबे' आणि आपल्याकडील पेठचे 'पेन्ट' करून इंग्रजांनी दूरदूरच्या ठिकाणांवरही 'नाविक' सूड उगवला. (कोणी इतिहास-संशोधक या इंग्रजांनी घेतलेल्या नाविक सूडाची कोणी मोजदाद करील काय?) 'चांदवड' चे 'चांदोर' मात्र इंग्रजांनी केलेले नाही. त्यांच्या आधीच्या सलतनतीचे हे कार्य आहे.

इंग्रजांनी माणसांवर फारसा नाविक सूड घेतल्याचे महाराष्ट्रात दिसत नाही. फक्त माधवरावांचे 'माड्युराव' केल्याचे उदाहरण आहे. बंगालमध्ये मात्र त्यांनी थोडासा प्रयत्न केल्याचे दिसते. 'ठाकूर' चे टागोर, 'चट्टोपाध्याय' चे चॅटर्जी, 'बंदोपाध्याय' चे बॅनर्जी झालेले दिसते. पण त्यास सुभाषचे 'शुभाश' करणारे सोनेर बाँगलाचे सुपुत्र जबाबदार नसतील, असे नाही. बंगाली लोकांप्रमाणे आपण फारसे 'रॉसगोल्ले' खात नाही. आपल्याला मिरच्यांची भजीच आवडतात. त्यामुळे कदाचित आपले उच्चार जास्त स्पष्ट होत असावेत. (या बाबतीतही संशोधकांनी लक्ष दिले पाहिजे.)

किल्येकदा आपल्या परिचितांचा व स्नेही मंडळींचा चाललेला 'नाविक' छळवाद पाहण्याची वेळ येते. अर्थात ज्यांचा हा छळ होत असतो, त्यांना त्यांची जाणीवही पुष्कळदा नसल्याने आपणही हा छळ उघड्या डोळ्याने पाहून, खरे सांगायचे, तर उघड्या कानांनी ऐकून दुर्लक्ष करणेच इष्ट असते. कोणे एके काळी मी प्र.स.प. च्या अधिवेशनाला गेलो होतो. मुंबईच्या श्री. 'हॅरीश' ना 'हरिश' केलेले मी ऐकले आहे. मालेगावचे माझे मित्र- हरून अल रशीद ह्या प्रख्यात बादशहाशी थोडेबहुत नामसाधर्म्य असलेले माजी आमदार व काँग्रेसी पुढारी श्री. हरून अन्सारी याचे चक्क 'अरुण', 'अरुणसाहेब' केलेले मी पाहिले आहे. कोणालाही एकेरी नावाने संबोधणे ही काही पार्टी कॉमरेडस्‌ची फॅशन होती. त्याने कॉम्रेडशिप वाढत असावी. या नाविक छळामुळे हरूनसाहेबांनी पुढे प्र.स. पक्ष सोडला, असे मात्र माझे म्हणणे नाही. कारण काँग्रेसमध्येही असे 'नाविक' हाल झाल्याचे एक उदाहरण तरी माझ्या ऐकिवात आहे. माझे एक मित्र, काँग्रेसचे एकनिष्ठ कार्यकर्ते व पुढारी आमदार ल.रा. आबड ह्यांचे काँग्रेसच्या खुल्या अधिवेशनात एकदा भाषण झाले. हजारो लोक उपस्थित होते. आधीच्या वक्त्याचे भाषण संपताच 'श्री. आबाद!' असा लाऊडस्पीकरवरून खणखणीत आवाजात पुकारा झाला. 'आबाद' म्हणजे आपणच, हे श्री. आबड यांच्या लक्षात येण्यास वेळ लागला नाही. मात्र अधिवेशनास उपस्थित असलेले लोक त्यांना 'आबाद' च समजले असतील. कारण लाऊडस्पीकरवरून श्री. आबड यांचे नाव जाहीर करणारे प्रत्यक्ष पं. जवाहरलाल नेहरू स्वतः होते!

**प्रसिद्धी : 'गावकरी', जाने-६८.**

**प्रेषकः प्रा. विद्यागौरी टिळक, सोमेश्वरनगर.**

○○○

# अर्थनिर्धारणाची प्रक्रिया आणि भाषाविज्ञान

- शैलेश सदाशिव पुंडलिक

## भाग पहिला

*लौकिकानां हि साधूनामर्थं वागनुवर्तते ।*

*ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति ॥*

*भवभूती (उत्तररामचरितम्)*

कालिदासाने अर्थ आणि वाणी यांचे संपृक्तत्व शिवशक्ती संपृक्तत्वासारखे चिरंतन, अबाधित आणि नित्ययुक्त आहे, असे मानले (वागर्थाविव संपृक्तौ...) तरी सर्वसामान्य भाषाव्यवहारात त्यांचे पृथक्त्व मानण्याची जी नैसर्गिक वृत्ती भवभूतीच्या उद्‌गारांमध्ये आढळते, त्यामागे असलेली तत्त्वदर्शिता (insight) वर्तनवाद आणि निर्देशवादात अनुस्यूत आहे. अर्थद्रव्य (meaning as entily) हे भाषिक उपकरणे असणाऱ्या ध्वनी आणि अक्षरे या चिन्हांच्या व्यतिरिक्त स्वरूपात उपलब्ध होते. किंबहुना चित्रकलेचे रंग, संगीतातील सूर, शिल्पातील पाषाण यांप्रमाणे भाषिक ध्वनी हे त्या अर्थाच्या संवाहनासाठी किंवा संप्रेषणासाठी वापरले जाणारे माध्यम आणि काही प्रमाणात वस्तुद्रव्य आहे, अशी भूमिका यांत्रिकी (mechanical किंवा mechanistic) जडवादी भाषाविज्ञानांच्या अभ्यासास परिपोषक ठरली.

अठराव्या आणि एकोणिसाव्या शतकांमध्ये भौतिकी विज्ञानांनी जी नेत्रदीपक प्रगती करून दाखविली, तीत निरीक्षण आणि प्रयोग यांचे काटेकोर पालन आणि उपलब्ध संख्यांचे (quantities) बिनचूक मापन या अभ्यासपद्धतीचा फार मोठा वाटा होता. त्यांना आधारभूत असलेली ऐंद्रिय अनुभूतिप्रधान (empirical) मूलतत्त्वमीमांसा मानसशास्त्र, तत्त्वज्ञान आणि भाषाविज्ञान या शास्त्रांमध्ये सुद्धा उतरली. त्यातून Soul, Spirit, self यांसारखे प्रयोग, निरीक्षण, मापन यांच्या कसोट्यांवर न उतरणारे शब्द शास्त्रीय विवेचनातून हद्दपार करण्यात आले.

भाषाविज्ञानातही अर्थ (meaning) या शब्दाची वास्तविक हकालपट्टीच होणे अपेक्षित होते; पण तसे करणे अगदी शक्य नाही झाले, तरी अर्थ शब्दाला यांत्रिकी (mechanistic) मनोवृत्तीच्या प्रवाहात आणण्याचे प्रयत्न जरूर झाले. पाव्हलॉवच्या प्रयोगांवर आधारलेल्या या संरचनावादी (structuralist) उपपत्तीचे टोकाचे स्वरूप

सी.सी.फ्रीस आणि हॅरिस यांच्या लिखाणात आढळते. उदा., फ्रीस यांच्या म्हणण्याप्रमाणे भाषावैज्ञानिकांना "... how an understanding of the mechanism of our language must be gained", हे जाणण्याची इच्छा असते.

वर्तनवादाच्या प्रमुख भाषावैज्ञानिकांतील लेनार्ड ब्लूमफील्ड यांनी अर्थाची व्याख्या करताना 'ज्या परिस्थितीत बोलणारा तो शब्द बोलतो आणि त्याला श्रोत्याकडून जी प्रतिक्रिया अपेक्षित असते', त्या सर्वच घटकांचा वापर केलेला आहे. या व्याख्येचे स्पष्टीकरण करताना त्यांनी असे नमूद केले, की एखादा वाक्प्रयोग ज्या प्रसंगांमध्ये वापरला जातो, त्या सर्वांमध्ये काही वैशिष्ट्यपूर्ण आणि समान गुणधर्म असायला हवेत. त्याप्रमाणेच वक्त्याला श्रोत्याकडून ज्या प्रतिक्रिया अपेक्षित असतात, त्यांमध्येही काही वैशिष्ट्यपूर्ण आणि सामायिक (common) असे गुणधर्म असणे आवश्यक आहे.

पण या स्वरूपाचे विवेचन आल्स्टन यांना मान्य नाही. त्यांच्या मते Bring me another cup of coffee आणि No more coffee please यांत गृहीत असणाऱ्या प्रसंगांत काही समानता आहे, असे मानता येत नाही. Come in अशी आज्ञा दिली असता आत येणे, आत न येणे, कारण विचारणे, तुच्छतेने अपमान करणे, बाहेरच थांबण्यासाठी परवानगी मागणे या प्रतिक्रिया उपलब्ध होऊ शकतात. तेव्हा ऐकणाऱ्याकडून अपेक्षित अशी प्रतिक्रिया अर्थनिर्धारणात मानली जाऊ नये.

पण वास्तविक पाहता उद्‌गार आणि प्रत्यक्ष प्रतिक्रिया नव्हे, तर परंपरेने अपेक्षिली जाणारी प्रतिक्रिया यांची सांगड अर्थनिर्धारणात अनुस्यूत आहे. त्यासाठी उद्‌गाराची पार्श्वभूमी जशी विचारार्ह आहे, त्याप्रमाणे प्रतिक्रिया आणि तिची पार्श्वभूमी याही विचारणीय आहेत. उदा., मुलाला अजून बाहेर खेळायचे असेल किंवा त्याला आज्ञेमागचे कारण समजले नसेल वगैरे स्थितिघटकांतरामुळे आणि तदानुषंगिक स्थितिरचनांतरणामुळे (change in the elements of a situation and the consequent change in the structure of the situation) त्याच्या प्रतिक्रियेत फरक पडतो. पण या स्थितिरचनांतरणाच्या आणि प्रतिक्रियांतील बदलांच्या मर्यादा फार मर्यादित स्वरूपात उपलब्ध होतात. (margins of variation exhibit a narrow range) असे त्याबद्दल म्हणता येईल. तेव्हा स्थितिरचनांतरण आणि स्थित्यंतरण या दोन्ही दृष्टिकोनांतून पाहता त्या बालकाची प्रतिक्रिया ही प्रतिक्रियारचनांतरात किंवा प्रतिक्रियांतरात जमा होईल. या दोनही निकषांवर ब्लूमफील्ड यांची व्याख्या निर्दोष ठरवता येईल.

Come in असे म्हटल्यावर मुलाने घरात किंवा तत्सम वास्तुरचनेत यावे, अशी पालकाची अपेक्षा असते. त्याप्रमाणे ती reward and punishment या तत्त्वांवर आधारून दृढीकृत (reinforced and overlearnt) होत जाते. ही प्रतिक्रिया व्यक्त करण्याची क्षमता मुलात आलेली आहे, हे गृहीत धरले, तरच त्याने व्यक्त केलेल्या अन्य

प्रतिक्रिया गंभीरपणे घेता येतील. अन्यथा त्याला Come in चा अर्थ समजलेला नाही, असे मानले जाते. हा भाषेच्या नियमबद्धतेचा भाग आहे.

त्यामुळे मुलांच्या प्रतिक्रिया वेगवेगळया स्वरूपांत उपलब्ध होतात. म्हणून Come in या वाक्यप्रयोगामागे असणारी आणि दृढीकृत झालेली अपेक्षा बदलत नाही. 'मला पाणी आणून दे' असे म्हटल्यावर margins of variation मध्ये अंतर्भूत होणाऱ्या प्रतिक्रियांबाबत फारसे वाद होणार नाहीत. पण काहीही आणून देणे, काहीही आणून न देणे, काहीही करणे आणि काहीही न करणे असे पर्याय प्रतिक्रिया म्हणून उपलब्ध होऊ लागले, तर भाषाव्यवहार ठप्प होईल आणि कदाचित जगरहाटी सुद्धा बंद पडेल. एखाद्या परिस्थितीत 'मला पाणी आणून दे' असे म्हटल्यावर त्यावर एक विशिष्ट प्रतिक्रिया अपेक्षित आहे, हे बोलणाऱ्याला जसे माहीत असते, तसे ते ऐकणाऱ्यालाही माहीत असते. 'मला', 'पाणी', 'आणून' 'दे' या प्रत्येक भाषाखंडाचा पृथक् आणि वाक्यातील संयुक्त अर्थ लक्षात घेऊनच हा भाषाव्यवहार केला जातो. त्याचा आधार हा आहे, की त्या वाक्याला अपेक्षित असणारी प्रतिक्रिया नुसतीच वक्ता आणि श्रोता यांना पूर्वज्ञात नसते, तर ती दोघांनाही पूर्वज्ञात आहे, हेही त्यांना पूर्वज्ञात असते. त्यामुळे ध्वनिसमूह (given sounds) आणि त्यांची प्रतिक्रिया यांच्या सहवर्तनाबाबत त्यांचे एकमत नसेल, तर उपयोजित भाषाप्रयोगाचा अर्थ त्यांना पृथक्पणे किंवा संयुक्तपणे समजलेला नाही, असे म्हणतात. किंबहुना या निष्कर्षावर-सुद्धा वाचकांचे आणि माझे एकमत असणे आवश्यक आहे (असे मला वाटते) अन्यथा व्यवहारात अनवस्था प्रसंग ओढवेल.

संरचनावादी अर्थनिर्धारणावर आल्स्टन यांनी घेतलेले आक्षेप सदोष आहेत, याचा अर्थ संरचनावादी अर्थनिर्धारण निर्दोष होते, असा नव्हे. भाषाप्रयोगांचा अर्थ भाषाव्यवहारात शोधणे आवश्यक आहे, ही त्यांची खरी अंतर्दृष्टी (insight) होती. त्यांच्या त्या प्रयत्नात त्यांनी जे. एल्. ऑस्टिन यांच्या illocutionary act; illocutionary act potential वगैरे कल्पनांवर आधारित विवेचन केले. त्यांची अर्थनिर्धारणाची प्रक्रिया भाषाविश्लेषणाच्या तत्त्वज्ञानावर (Philosoply of Analysis of language) आधारित असून, त्यातील काही मुद्दे लक्षात घेण्यासारखे आहेत.

## भाग दुसरा

मनुष्य जेव्हा बोलतो, तेव्हा तो काय करत असतो, याचे उत्तर चौपदरी आहे. त्यामध्ये प्रत्यक्ष भाषणाची क्रिया (locution), एखाद्या गोष्टीचा निर्देश आणि तिचे गुणधर्म सांगणे, काही गोष्टींचे विधान करणे (illocutionary act) आणि त्याद्वारे काही गोष्टी घडवून आणणे (perlocutionary effect) या चार धाग्यांत भाषाव्यवहारातील कार्ये/कृत्ये (speech acts) घडत जातात. प्रत्यक्ष वापरली जाणारी भाषिक सामग्री, तिचे उपयोजन, तसेच तिचा परिणाम यांच्यांत विविधरंगी

भिन्नता आढळून येते. उदा., Can you reach the salt? हा प्रश्न Pass me some salt please याप्रमाणे विनंती, Pass me the salt याप्रमाणे आज्ञा, Can you reach the salt याप्रमाणे पृच्छा अशा अनेकविध वाक्कार्यांसाठी (speech acts) वापरता येईल.

भाषाव्यवहारात प्रत्यक्ष वापरले जाणारे शब्द आणि वाक्ये यांबरोबर ज्या परिस्थितीत, ज्या व्यक्तीने, ज्या श्रोत्यासाठी ही वाक्ये वापरलेली असतात, त्या सर्व घटकांना अनुलक्षून वक्त्याच्या विधानातून जे ईप्सित सामर्थ्य (intended force) त्या विधानात येते, त्याला illocutionary force किंवा विधानीय सामर्थ्य किंवा उद्‌गारसामर्थ्य असे म्हणता येते. त्यात वक्त्याला अभिप्रेत असलेल्या उद्दिष्टाच्या पूर्तीसाठी उपयोजित असलेली संरचना कार्यप्रवण होते. त्याचा परिणाम तदनुसार व्हावा, असे त्यामागे अपेक्षित आहे.

Illocutionary force किंवा illocutionary act potential याचा अर्थ पुढील विवेचनात स्पष्ट करण्यात आलेला आहे. या संकल्पनांचा वापर करीत आल्स्टन यांनी भाषातत्त्वज्ञाच्या दृष्टिकोनातून सुसंगत असणारी त्यांची अर्थनिर्धारणाची प्रक्रिया मांडलेली आहे. Report, announce, predict यांसारख्या शब्दांनी illocutionary act/force तर persuade, deceive सारख्या शब्दांनी perlocutionary effect ची संकल्पना मांडता येते.

आतां ज्याप्रमाणे एका वाक्याचे अनेक अर्थ होऊ शकतात, त्याप्रमाणे अनेक वाक्यांचा एक अर्थ होऊ शकतो. उदा., She is my paternal grandmother आणि She is my father's mother ही दोन्ही वाक्ये एकाच अर्थाचे निर्धारण करतात, असे म्हणायला हवे. याप्रमाणे दोन वाक्ये जर एकत्र illocutionary act करत असतील, तर त्यांच्यांत एकच illocutionary act potential आहे. याचेच दुसरे उत्कृष्ट उदाहरण म्हणजे इंग्रजी भाषेतील active/passive वाक्यरचना आहे, असे म्हणता येईल.

He hit the ball hard आणि

The ball was hit hard by him

या वाक्यांचे illocutionary act potential एकच आहे, असा युक्तिवाद करता येईल. त्यामुळे या दोन्ही वाक्यांचा अर्थ एकत्र आहे, असे म्हणता येईल. आल्स्टन यांच्या सूत्ररूपात ही गोष्ट

$S_1$ means $S_2$ = df $S_1$ and $S_2$ have the same illocutionary act potential.

$S_1$ = वाक्य १



अनुक्रमणिका

$S_2$ = वाक्य २

df म्हणजे स्पष्टीकरण, व्याख्या किंवा तत्सम अन्य विधाने.

(वाक्य १ आणि वाक्य २ यांचा अर्थ एकच आहे, याचे स्पष्टीकरण किंवा व्याख्या अशी, की वाक्य १ आणि वाक्य २ यांचे उद्‌गार – कार्यसामर्थ्य एकच आहे.)

आता ही व्याख्या शब्दार्थांच्या स्पष्टीकरणात कशी वापरता येईल ? शब्दाला काही उद्‌गारसामर्थ्य आहे, असे म्हणणे अवघड आहे. पण वाक्यार्थाच्या समग्रतेत प्रत्येक शब्द त्याचे काही अंशी अर्थप्रदान करीत असतो. 'मला मीठ पाहिजे' याऐवजी 'मला साखर पाहिजे' असे म्हटले, तर वाक्याच्या अर्थात फरक पडतो, हे सर्वज्ञात आहे तेव्हा मीठ आणि साखर या शब्दांच्या वापराने हा फरक व्यतिरेकाने दाखवता येतो तसा 'मी भरपूर मीठ खातो' आणि 'मला मीठ फार आवडते' या वाक्यांचा अर्थ इतर शब्दांमुळे भिन्न झाला, तरी अन्वयाधारे 'मीठ' या शब्दाचा अर्थ एकच आहे, असे निर्धारित करता येते. 'मला लवण हवे' आणि 'मला मीठ हवे' यांतील 'मीठ' आणि 'लवण' हे शब्द भिन्न असले, तरी वाक्यांचा अर्थ एकच राहतो. तेव्हा 'मीठ' आणि 'लवण' हे शब्द वाक्याच्या illocutionary force मध्ये समान स्वरूपाचे अर्थप्रदान (contribution) करतात, असे दिसते. Never procrastinate आणि Never put things off यांसारख्या वाक्यांबाबतही तेच म्हणावे लागेल. त्यामुळे आल्स्टन यांनी शब्दार्थासंबंधी दुसरे सूत्र तयार केले, ते असे :

W1 means W2 = df. W1 and W2 can be substituted for each other in a wide range of sentences without altering the illocutionary act potential of those sentences.

'मुलगा' या शब्दाचा अर्थ boy, garcon या दुसऱ्या शब्दांनी सांगता येतो. How are you? याचा अर्थ 'काय, कसं काय ? ठीक आहे ना ?' या प्रश्नाने तसेच 'Comment allez vous?' यानेही सांगता येतो. यापूर्वी म्हटल्याप्रमाणे एका शब्दाचा किंवा शब्दसमूहाचा अर्थ सांगताना दुसरा शब्द किंवा शब्दसमूह वापरता येतो. त्यात त्यांचा illocutionary force एकच असतो, असे आढळले, म्हणजे ते शब्द एकमेकांना पर्याय म्हणून वाक्यात वापरता येतील किंवा ती वाक्ये एकमेकांना पर्याय म्हणून भाषाव्यवहारात वापरता येतील. याप्रमाणे एका वाक्याचा किंवा शब्दाचा अर्थ ठरवताना १. दुसरे वाक्य किंवा शब्द वापरले पाहिजेत आणि २. ते एकमेकांना पर्याय (substitute) म्हणून वापरता आले पाहिजेत, असे दोन निकष उपलब्ध होतात.

या विचारधारेतील महत्त्वाचे तथ्य हे आहे, की कोणत्याही भाषाखंडाचा अर्थ व्यक्त करण्यासाठी दुसऱ्या भाषाखंडाचा किंवा भाषाव्यवहाराचा उपयोग करावा लागतो, हे सत्य आहे. त्यामुळे अर्थ ही भाषाव्यवहाराच्या निरपेक्ष, भाषासंस्थेच्या बाहेर उपलब्ध होणारी अशी वस्तू नव्हे, तर तिचे अस्तित्व भाषा या एका स्वबद्ध (Self-

limited) आणि स्वसंबद्ध (organically self structured) अशा संस्थेत/व्यवस्थेत शोधायला हवे, हे मूलतत्त्व लक्षात घेऊन, भाषावैज्ञानिकांनी त्याचा अभ्यास करण्याची गरज आहे. त्यामुळे अर्थाच्या संरचनावादी व्याख्येवर आल्स्टन यांनी घेतलेले आक्षेप सदोष असले, तरी ती व्याख्या स्वतः निर्दोष होते, असे म्हणता येणार नाही.

भाषातत्त्वज्ञांच्या या संकल्पना सुद्धा पूर्ण निर्दोष आहेत, असे म्हणणे अवघड आहे. पण काही वरवर पाहता सुद्धा सदोष वाटणाऱ्या गोष्टींचे निराकरण करणे प्रथम आवश्यक आहे. उदा., आल्स्टन यांची काही उदाहरणे कृत्रिम वाटतात. उदा., She is my maternal grandmother आणि She is my father's mother ही दोन्ही वाक्ये समानार्थक आहेत असे, म्हणता येईल; पण प्रत्यक्षात ती खरोखरच भाषाव्यवहारात वापरली जातात का? यांतील एक वाक्य लॅटिन, तर दुसरे इंग्रजी वाटते. तसे पाहिले, तर He is my son याऐवजी He is my fils असेही म्हणता येईल; She is my femme असेही म्हणता येईल; पण इंग्रजी वाक्यात फ्रेंच शब्द घालून ही वाक्ये ज्याप्रमाणे fabricate केल्यासारखी वाटतात, त्याप्रमाणे पण जरा कमी प्रमाणात She is maternal grandmother म्हटल्यासारखे वाटते.

दुसरे म्हणजे, ॲक्टिव्ह आणि पॅसिव्ह या वाक्यांचे अर्थ एकच आहेत, असे व्याकरणकार मानत नाहीत. त्यांच्या मते He hit the ball हे वाक्य he शब्दाला प्राधान्य देते, तर the ball was hit by him हे वाक्य the ball याला प्राधान्य देते. He hit याचा अर्थ he hit असाच होतो. I hit..., She hit किंवा you hit... वगैरेसारखा होत नाही. याउलट, The ball was hit याने the ball was hit असे होते. table was hit, the bat was hit असे होत नाही, तेव्हा he, the ball या शब्दांना असणारे प्राधान्य हा त्या वाक्याचा प्रमुख भाग आहे. आता इतर आक्षेपांचा विचार करू.

एखाद्या वाक्याला एक सर्वसामान्य आणि इतर अनेक अर्थ आहेत, असे म्हटले, तर त्यात स्वव्याघाताचा दोष येईल. 'मला पाणी पाहिजे', याचा प्रमुख अर्थ 'मला पाणी पाहिजे' असा असला, तरी त्याचा एक गौण अर्थ 'मला पाणी नको आहे' असाही होऊ शकेल. 'I entirely agree with you' याचा अर्थ 'I entirely disagree with you' असाही करता येतो. वेगवेगळया परिस्थितींत वेगवेगळया व्यक्तींनी वेगवेगळया उद्देशांनी वापरलेल्या एकाच विधानाचे अर्थ भिन्न भिन्न होऊ शकतात; पण अशा वेळी त्याची deep structure वेगळी असते, हे व्याकरणाच्या दृष्टीने (grammar) नव्हे; तर संज्ञापन क्षमतेच्या (Social competence, communicative competence) दृष्टिकोनातून पाहावे, हे लक्षात घेतले, तरच हा तिढा सुटेल.

दुसरे म्हणजे, उद्‌गारकार्यसामर्थ्य किंवा उद्‌गारसामर्थ्यसंधृती (illocutionary act potential) म्हणजे नेमके काय, हे आल्स्टन स्पष्ट करू शकत नाहीत. अर्थ म्हणजे





अनुक्रमणिका

काय, असे विचारल्यावर उद्‌गारसामर्थ्य न बदलता जो शब्द/जे विधान त्याला पर्याय म्हणून वापरता येते, तो शब्द/ते विधान, हे म्हणणे तसे निर्दोष आहे. पण उद्‌गारसामर्थ्य न बदलण्याच्या अटीतच 'एक अर्थ जो सर्वसामान्य आणि इतर अर्थांपेक्षा अधिक सामर्थ्यवान' आहे, असे गृहीत धरण्याची आपत्ती ओढवते. हा चक्री युक्तिवाद (circular argument) होईल.

एका वाक्याचा अर्थ दुसरे वाक्य आहे, असे म्हणण्यात अनवस्था प्रसंग (infinite regress) ओढवेल. 'मला पेन आणून दे', असे जेव्हा मी माझ्या मुलाला सांगतो, तेव्हा पेन म्हणजे काय, या प्रश्नाला 'ज्याने कागदावर लिहिता येते', असे उत्तर मी देऊ शकत नाही. कारण मग लगेच 'कागद म्हणजे काय?' असाही प्रश्न उपस्थित होतो. त्या वेळी उत्तराचे दोन पर्याय आहेत. एक म्हणजे 'ज्याच्यावर पेनने लिहिता येते', असे सांगणे किंवा 'जो वृक्ष आणि वनस्पतींच्या लगद्याने बनवला जातो' असे सांगणे. यांतील पहिले उत्तर चक्री स्वरूपात जमा होईल, तर दुसरे उत्तर 'वृक्ष', 'वनस्पती', 'लगदा', 'बनवणे' वगैरे सर्वच विषयांबाबत असून नव्या प्रश्नांना जन्म देईल. याखेरीज मूल आज्ञार्थी विधानातील शब्दांबद्दलही असाच अनवस्था प्रसंग ओढवू शकतो. याचा अर्थ कोणत्याही मार्गाचा अवलंब केला, तरी आल्स्टन यांचा मुद्दा टिकणारा नाही. सर्वसामान्य लोक तत्त्वज्ञ नसल्याने ते अशा मार्गांचा वापर करीत नाहीत. ते काम करतात, त्याचा आढावा यापुढच्या चर्चेत येईल; पण आल्स्टन यांच्याविरुद्ध जे भाषावैज्ञानिक आक्षेप घेता येतील, त्यांचा विचार येथे मांडू.

To die याचा अर्थ सांगताना to kick the bucket असे म्हणणे खरेच सयुक्तिक आहे का? यमसदनाला जाणे, राम म्हणणे, भगवान का प्यारा होना, हे तरी खऱ्या अर्थाने समानार्थक आहेत, असे म्हणता येईल का? murder, kill, manslaughter assasinate एकमेकांना पर्याय म्हणून उपलब्ध होतात का? Pail आणि bucket तसेच wait आणि tarry यांचा अर्थ एकच म्हणता येईल का? I have great pleasure in introducing Miss Martha... आणि Folks, this is Martha हे एकमेकांना पर्याय म्हणून उपलब्ध होतात का? असे अनेकविध प्रश्न जन्माला येतात. आता या सर्वांचे illocutionary act potential एकच आहे, की नाही, हा वादाचा मुद्दा बाजूला ठेवला, तरी ते एकमेकांचे पर्याय होत नाहीत, हे स्पष्ट आहे.

Garcon म्हणजे boy असे सांगणे हे ज्याला फ्रेंच आणि इंग्रजी या दोन्ही भाषा समजतात, त्याला ठीक आहे. नीर याचा अर्थ पानीयम् आहे, असे म्हटले, तर ज्याला पानीयम्‌चा अर्थ आधी माहीत आहे, त्याला काही अडचण येणार नाही. सारांश, ज्याला कमीत कमी काही शब्दांचा अर्थ तरी इतर शब्दांच्या साहाय्यावाचून पूर्वज्ञात आहे, त्यालाच ही पर्यायी शब्दांची योजना उपयुक्त वाटेल.

पूर्ण समानार्थता (total synonymy) भाषेत उपलब्ध होत नाही. असे

भाषाविज्ञानात बऱ्याच वेळा बोलले जाते. To die हा शब्द सर्वसामान्य व्यवहारातील आहे, तर Kicking the bucket हा बोली भाषेत येतो. योजनाबद्धतेमुळे murder हा शब्द वापरतात, तर उद्देशरहिततेमुळे किंवा पूर्वनियोजितता नसल्याने man-slaughter हा शब्द वापरतात. pail आणि bucket यांतील फरक भौगोलिक आहे, चपाती आणि पोळी यांतील फरक सामाजिक आहे, wait आणि tarry हे गद्य आणि पद्य यांत आढळणारे आहेत, तर I have great pleasure in introducing... आणि folks, this is.. यांतील फरक औपचारिक/अनौपचारिक शैलींतील फरक आहे. मयत होणे, देवाज्ञा होणे, महानिर्वाण होणे वगैरे वाक्प्रयोग सुद्धा काही विशिष्ट ठिकाणीच वापरता येतात.

भाषा ही विविध प्रसंगांत, विविध स्तरांवर आणि विविध उद्देशांनी वापरली जाते. तिच्यात असणारी लवचिकता तिला अनंत अभिव्यक्तिसामर्थ्य देते. मानवाच्या गरजेनुसार नित्यनूतन रूप धारण करण्याची तिची क्षमता आहे. पण मानवाच्या अभिव्यक्तीच्या गरजाही नित्यनूतन अशा असतात. अगदी चिरंतन, सनातन काळापासून चालत आलेले विचार, भावभावना यांनाही अभिव्यक्ती द्यायची म्हटली, तरी बदलत्या सांस्कृतिक, सामाजिक, भौगोलिक, इत्यादी परिस्थितीत भाषिक रचनाही सतत बदलत्या राहणे अपरिहार्य आहे, हा मुद्दा आल्स्टन यांनी विचारात घेतलेला नाही. आपण एकाच अर्थाचे दोन शब्द वापरतो, हे खरे, म्हणजे ढोबळ अर्थानेच खरे आहे. illocutionary act potential बदलणे/न बदलणे ही एक सापेक्षतेने ठरवण्याची क्रिया आहे. त्यामुळे आल्स्टन यांचे विवेचन मूलगामी आणि उद्‌बोधक असले, तरी ते सर्वमान्य होण्यासारखे नाही.

**भाषाशिक्षण विभाग, एस्. एन्. डी. टी. महिला विद्यापीठ, मुंबई ४०००२०**

○○○





अनुक्रमणिका

# नात बोलते, हे निमित्त

- शरदिनी मोहिते

भरपूर, म्हणजे भरपूरच झोप काढून झाल्यावर, आणि आईच्या कुशीत निवांत झोपून, तिचा अमृत–पान्हा मनमुराद पिऊन झाल्यावर हळूच उमटणारा, तृप्तीचा हुंकार ही बाळाची पहिली भाषा. त्याने स्वतः अगदी जाणीवपूर्वक केलेली नव्हे, तर त्याच्याकडून न कळत प्रकटलेली! तीही सकारण!

बाळाने जन्मल्यानंतर प्रथम आणि नंतरही कित्येकदा सोडलेले रुदनास्त्र ही तशी 'भाषा' नव्हे. ती त्याच्याकडून घडणारी सहजक्रिया होय... तसे पाहिल्यास, हजारो, लाखोंत एखादाच अभागी मुका असतो आणि मग डोळयांच्या, ओठांच्या, हातांच्या, मानेच्या व खूप हालचाली, नंतर लिहिणे हाच त्याचा भावना प्रकट करण्याचा मार्ग बनून गेलेला असतो. हेच त्याच्याजवळ माध्यम असते. पण सर्वसामान्यतः घडणारी गोष्ट अशी, की थोडे मोठे होताच, बोलायला यायला लागल्यावर प्रत्येकजण बोल बोल बोलणार असतो...त्याची सुरुवात या हुंकाराने होत असते.

बाळ प्रत्यक्ष सर्व बोलून, भाषेचा जाणीवपूर्वक वापर करू लागण्यापूर्वीचे त्याच्या भाषेचे टप्पे पाहणे मनोरंजक, अतिशय कौतुकाचे आणि अभिमानाचेही ठरते. प्रत्येक बाळाची ह्या बाबतीतली प्रगती वेगवेगळया प्रकारे आणि वेगळया गतीची असणार, हे उघडच आहे. काही बाळे लवकर बोलायला सुरुवात करतात. विशेष लक्ष देऊन जर कोणी मुलांना शिकवले, तर चांगल्या ग्रहणशक्तीची मुले अधिक लवकर बोलायला लागतात. मोठ्या कोणी याबाबत आळस करत राहिले किंवा मूलच थोडे संथ स्वभावाचे असले, तर त्या वेळी सुरुवातही संथच होते आणि दुसऱ्या कोणी शिकवण्याची गोष्ट वेगळीच. बाळ स्वतः देखील चौकस असते. निरखत असते, ऐकत असते आणि शिकत असते. हे स्वयंशिक्षण चालू असताना बाळाला स्वतःला काही बोलायचे असते, त्याचप्रमाणे सहवासाची आवड किंवा आधाराची निकड जाणवल्यामुळे आपण त्याच्याकडे लक्ष द्यावे, त्याच्याशी बोलावे, बोलतच राहावे, अशी त्याची अपेक्षा असते. आपण त्याच्याशी बोललो, म्हणजे बाळाला अगत्य जाणवतेच, शिवाय बाळ आपल्या बोलण्यात गुंगून जाते. मनापासून त्यात दंग होऊन ऐकत राहते आणि स्वतःही तसे बोलण्याचा प्रयत्न करते.

ज्यांच्या साहाय्याने भाषा बोलता येते, अशा तोंडातल्या सर्व अवयवांची वाढ मूल लहान असताना झालेली नसते. घडण पक्की झालेली नसते. तोंडात दात येईपर्यंत सहसा 'त' वर्ग बाद झालेला असतो. शिवाय 'स' वर्गाचेही उच्चारण नीट होऊ शकत नाही. त्यामुळे उच्चारात बोबडेपणा येतो. बहुतेक मुले 'र' चा 'ल' किंवा 'अ' किंवा 'ड' किंवा 'य' असा उच्चार करतात. बोबडेपणाची गंमत जास्तीकरून या 'र' मध्येच असते. पण बोबडेपणाच्या कोवळ्या गोडव्याला किती महत्त्व द्यावे, याला देखील सीमा हवी. एकनाथांनी 'कुला, थमाल ले।' मध्ये पेंद्याच्या बोबडेपणाला जणू गौरवले. पण पुष्कळदा होते काय, की लाडाच्या आणि प्रेमाच्या भरात मोठी माणसेच बोबडी बोलतात. मुलांशी शुद्ध भाषेत बोलणे हा गुन्हा समजतात. त्यामुळे शुद्ध बोलणे एखाद्या बाळाला शक्य झाले, तर ऐकणारा बावचळतो, अशी स्थिती आहे खरी.

अगदी सुरुवातीला बाळाच्या घशातून, घशातल्या घशात आवाज निघतात. तान्ही बाळे विशेष आवडीची किंवा सतत पाहण्यात असलेली माणसे जवळ आलेली दिसल्यावर, त्यांनी खेळवल्यावर, शीळ घातल्यावर प्रतिसाद देतात. हुंकार टाकून, त्या वेळी मोठ्या व्यक्तीचे आपल्याकडे जास्तीत जास्त लक्ष वेधले जावे, म्हणून चुळबूळ करणे, हातवारे करणे, तोंडातून काढता येतील, तेवढे आवाज काढणे याची जाणीवपूर्वक खटपट करतात...

ग ग गुर्रर वरून ब ब बुर्रर ब ब बुवा, बु बा बाबू बा बा, इत्यादी शब्द उमटण्यापर्यंत प्रगती होते. त्या वेळी आपण म्हणतो, बाळ बाबा म्हणू लागलं. वास्तविक त्या वेळी ब ब ची गंमत वाटून बाळ जणू खेळतच राहते. 'बाबा' हे 'बाबा' म्हणून समजून म्हणायला अजून अवकाशच असतो. शुद्ध स्वर आणि व ग म ब प व्यंजने तान्ह्या मुलाच्या रडण्यातून सहज चाळा म्हणून केलेल्या बडबडीतून केव्हाच उमटलेली असतात. परंतु आईला किंवा बाबांना हाक मारण्यासाठी म्हणून जाणीवपूर्वक जेव्हा मूल हे शब्द उच्चारेल, तेव्हाच आपण म्हणू शकतो, की बाळ आई म्हणायला शिकलं. सहज तोंडातून उमटलेल्या इबिडॅक अशा शब्दांना काय अर्थ आहे ? पण हे शब्द उमटले आणि ते उमटून जो नाद प्रकटला तेव्हा गंमत वाटून तेव्हा आमची ईशा दिवसभर इबिडॅकच म्हणत होती!.....

पण गंमत अशी, की ईशाला बोध झाला, की 'आई' हा शब्द हाका मारण्यासाठी उपयोगी शब्द आहे. तेव्हा ईशा कोणालाही आई म्हणूनच हाका मारू लागली. प्रत्येक जण 'आई' म्हणूनच हाकारले जाऊ लागले. बोलावले जाऊ लागले. आई ही आईच; पण बाबा, आजोबा, आजी, मामा, मावशी, मामी हे सारे आईच झाले. फार काय, मोत्या आणि मिकी माऊ देखील 'आईच' होऊन गेले, तेव्हा सारे जण कौतुकमिश्रित आश्चर्यात गढले आणि अशाच वेळी तिच्याच वयाचे असलेले आणखी एक बाळ यच्चयावत प्राण्यांना 'आई' म्हणूनच बोलवत, असलेले मला दिसले!

बाळाच्या बोलण्याची सुरुवात सोप्या शब्दांनी होत असते. आई, बाबा, ममा, मामा, पापा, दे, नाय..... अशा साध्या–सोप्या शब्दांना मोठी माणसं जोड देतात इतर शब्दांची. निरनिराळ्या मोठ्या नातेवाइकांची ओळख त्यांच्या संभाव्य संबोधनानिशी बाळाला करून देण्याचे काम घरातले सारेच करत असतात, हा काका, हा मामा, ही आत्या, ही मावशी, ही मामी, ही आज्ञी, असं करत 'म्हण, मामा' – 'म्हण- आज्ञी' अशा आज्ञा सोडल्या जातात. बाळही जमेल तेवढं, जमेल तसं म्हणण्याचा प्रयत्न करतं. मग कधी आज्ञीची जिजी देखील होते. कधी आजोबाचे जाजू होतात. पण प्रयत्न देखील बाळाच्या मनात असेल, तरच होतो हं! आणि फारसा प्रयत्न केला गेला नाही, तर स्वतःला सोयीचे वाटेल, तेच खरं संबोधन म्हणून बाळ मुकर्रर करून टाकतं!.....

आमच्या सांगली भागामध्ये मामेभावाला भाऊजी व मामेबहिणीला वहिनी म्हणण्याची पद्धत आहे. मी आणि माझी ताई मामेबहिणींना वहिनी म्हणालो; पण सर्व मोठ्यांनी शिकवण्यासाठी जंग जंग पछाडलं, तरी आम्ही भाऊजी नाही म्हटलं. मामेभावांना आम्ही फक्त 'भा' एवढंच म्हणून भागवलं! आज या वयातही नुसते 'भा' किंवा 'रामभा' म्हणून त्यांना हाका मारताना आम्हांला आमचं काही चुकते आहे, असं मुळी देखील वाटत नाही. आमच्या वाड्यातला अवी देखील आमच्याप्रमाणेच निघाला. 'फडके' एवढं म्हणणं त्याला नको वाटलं, तेव्हा इतरांप्रमाणे तो वडिलांना फडके म्हणाला नाही. त्यानं 'के' हा शॉर्ट फॉर्मच पत्करला!

आमच्या चिन्नूला मला मावशी म्हणून हाका मारायला शिकवायचा खूप प्रयत्न झाला. पण तिनं मला एक वेगळंच नाव बहाल केलं : 'आकम्'. आता शब्द म्हणून मावशी आणि आकम या शब्दांचा संबंध तरी काहीच दिसत नाही. पण मावशी म्हणायचे असताना ती म्हणाली 'म्या अं', 'न्या अं'; न्या अं चे झाले 'न्या कं' न्याकंचं झालं 'आकं'. शेवटी आकमच नाव पक्कं झालं. आज सारी भाचरं, एवढंच नाही, घरातले काही इतर मोठे लोकही आकमच म्हणतात मला! चिन्नूने मला न्या अं आकं केले, तर मम्मट मला सरळ 'आबा' म्हणाला, आबै देखील नाही. फक्त आबा मावशीचे संबोधन आबा म्हणजे अचाटच की नाही? शेवटी तोही आकमवर आला. हे चांगलंच झालं म्हणा 'आबा' पेक्षा!

दिवसभर इबिडॅग असं निरर्थक वाटणारं पण स्वतःला आवडणारे शब्द ईशा बोलत, बडबडत राहिली. तिला त्या शब्दांचा नाद आवडला असला पाहिजे, म्हणून ती त्या नादाशी खेळत राहिली असावी. नाद गोड वाटला, लयबद्ध वाटला, की बाळं खूश होऊन जातात. एका जुन्या गाण्याची साक्ष काढून ही गोष्ट पाहू.

'अडगुळं मडगुळं सोन्याचं कडगुळं' हे गाणं 'गद्य' चालीत साधेपणानं पण लयबद्ध म्हटलं, की रडणारं बाळ गप्प होऊन लक्ष देऊन ऐकू लागतं. या गीतात सोनं रुपं तरी आहे म्हणा; पण 'किमाड किमलंग' । किमि किमि पिमलंग किंवा 'खाकडुंकखुवऱ्या।

शोनम तुवऱ्या' असे काही बोलणं शुद्धच निरर्थक असलं, तरी बाळाला आकर्षक वाटतं. लय–बद्धता अंगात भिनली, की बाळही साधं गद्य न बोलता म्हणतं 'मोता मोता आना खाऊ।' आपल्याला खूप खाऊ हवाय् हे थोडं लिरिकल बनवूनच सांगितलं जातं. याखेरीज गंमत अशी, की आपल्याला अमुक एक गोष्ट हवी, असं सांगताना तसं थेट सांगण्याऐवजी इवल्या बाळांनाही कधी कधी व्यंजनेचा वापर करण्याची कल्पना सुचते. 'मला साखर हवी, असे सरळ सांगण्याऐवजी 'अनाटा (अनंता) शाख गो लात्ते, 'साखर गोड लागते) असे किंवा 'त्ताकेत (चॉकलेट) तित्ती श्यान (छान)', असंही माना वेळावत बोलण्याची युक्ती त्यांना सुचू शकते.

कधी कधी एखादी गमतीदार लकब, थोड्या काळासाठी का होईना, मुलाच्या बोलण्यात येऊन जाते. वत्सला जेव्हा म्हणते 'तू काय कतीम् ?' (तू काय करतीस) किंवा 'चान्नी (चांदणी) येतीम्, असं म् उगीचच जोडायची, आज हे काय 'म' चं वारं सुटलं, म्हणून एखादे वेळी कोणी चिडलं, तर ती चक्कच हसतीम्!

आपल्याला वाटतं खरं, की बाळांची बुद्धी ही बाळबुद्धीच असणार. आपण 'पाणी गढूळ का' याचं उत्तर जर दिलं, की पाऊस पडला, की पडताना त्यात माती मिसळते, तर निष्कर्ष काढण्याच्या सुरात 'पटलं, बुवा' म्हटल्यासारखं 'पाशानं पानी रंगतं', म्हणून मोकळं होणारी राणी कधी कधी विचारते 'परीक्षा संपली तुझी ?' तेव्हा कळते, की घरातल्या एका जवळच्या व्यक्तीच्या परीक्षेचा घरभर पसरलेला ताण तिलाही जाणवलाय् आणि काहीसा वैतागही वाटलाय्.

त्याहीपेक्षा थक्क व्हायला होतं की ती पडली, म्हणून खूप रडत असताना तिला दारावरून जाणारं रोडरोलरचं धूड दाखवायला तिला कडेवर घेऊन लगबगीने जात असताना गडबडीत पायांत स्लीपर वगैरे आपण घातलेच नाहीत आणि आपले पाय तापलेल्या वाळूत भाजतायत, पण बाळ राणीच्या रड्यामुळे आपल्याला त्याची जाणीवही नाही, अशा अवस्थेत रडता रडता थांबून बाळच जेव्हा विचारतं, 'पाय भातात (भाजतात) का तुजे ?' तेव्हा कडेवरूनच खाली वाकून आपण पाय कसेबसे उचलत असताना आपल्याला बसलेल्या चटक्यांची जाणीव होऊन व्याकूळ होणाऱ्या राणीला आपली व्याकुळता आपल्या शब्दांत व्यक्त करता आली, म्हणजे खरेच ती बोलायला लागली बरं का, अशी खात्री पटते आणि भानावर आणणारी गोष्ट मनाच्या पडद्यावर झळकते ती ही, की वत्सलतेचा मक्ता केवळ आपलाच नाही, इवलाली बाळंही वत्सलतेचा सागर असू शकतात!

**४३, विजयानगर कॉलनी, पुणे ३०.**

○○○

# अक्षरजुळणी आणि मुद्रणपद्धती

- दीपक घारे

भाषेसारखे प्रभावी माध्यम वापरण्यासाठी भाषेचे व्याकरण आणि शैली यांचा अभ्यास आवश्यक असतोच. पण या शैलीचा अविभाज्य भाग असलेल्या लिपीतील अक्षरचिन्हांचे दृश्य आकार, मुद्रित मजकुराला असलेले दृश्य व्यक्तिमत्त्व यांच्याकडे फारसे लक्ष दिले जात नाही. लेखकाला त्याच्या लेखनावर होणाऱ्या या संस्करणाचे भान असले पाहिजे, त्याला त्याची कविता, त्याचा लेख मुद्रित अवस्थेत आधीच 'दिसला' पाहिजे. तशी त्याच्याकडे क्षमता असेल, तर त्याच्या लेखनात अबोधपणे अधिक नेमकेपणा येईल.

व्यावहारिक पातळीवर बोलायचे, तर मुद्रकाची परिभाषा लेखकाला माहीत असली, की लेखकाला आपल्या अपेक्षा नेमक्या शब्दांत मुद्रकाला सांगता येतात आणि वेळेचा, पैशाचा अपव्यय टळतो, मुद्रण निर्दोष होते. वाचकांपर्यंत अधिक सुलभतेने पोहोचता येते. ग्रंथनिर्मितीमधले किंवा नियतकालिक चालवण्यातले अर्थकारण इतके मर्यादित आहे, की लेखकाच्या हस्तलिखितावर मुद्रणसुलभतेसाठी संस्कार करणे, संहिता निर्दोष करणे यांसाठी लागणारा वेळ, पैसा आणि निकड फार थोड्या ग्रंथ–प्रकाशकांकडे किंवा नियतकालिकांच्याकडे असते. म्हणून लेखकालाच आपल्या लेखनाच्या मुद्रणप्रतीबद्दल अधिक जागरूक राहिले पाहिजे. आता डी.टी.पी. संगणकांच्या युगात टंकलेखक, जुळारी या मधल्या दुव्यांची आवश्यकता उरलेली नाही. लेखकालाच आता संगणकावर जुळणी करून त्याचे प्रिंटआऊट मुद्रकाकडे पाठवावे लागले, तर नवल वाटायला नको. परदेशात याची सुरुवातही झाली आहे. यासाठीही प्रत्येक लेखकाने आधुनिक अक्षरजुळणी आणि मुद्रणपद्धतींची तोंडओळख वेळेवर करून घेणे आवश्यक आहे.

अक्षरजुळणीच्या आणि मुद्रणाच्या बदलत्या पद्धतींमुळे मराठी ग्रंथव्यवहाराचे दृश्य रूप खूपच बदलले आहे. मुद्रणाचा दर्जा, विविधता आणि त्याला येणारा खर्च या सर्वच घटकांवर या नव्या पद्धतींमुळे परिणाम झालेला आहे. सर्वसाधारण माणसाला, ज्यात लेखकही आले, झेरॉक्स-ऑफसेट, डीटीपी, लेझरप्रिंट (झबल्यातला झ, झिपरीतला झ नव्हे) अशी नुसती नावे माहिती असतात. अशा अर्धवट माहितीमुळे

लेखकाला एक तर गप्प बसावे लागते किंवा प्रकाशक/मुद्रकासमोर हास्यास्पद ठरण्याचा धोका पत्करून आपल्या मुद्रणाविषयीच्या अपेक्षा मांडाव्या लागतात. एखादी सूचना करताना ती मुद्रणात आणणे शक्य आहे, की नाही, त्याचा खर्च प्रकाशकाला परवडेल, की नाही, याची काहीच कल्पना लेखकाला नसते. असे होऊ नये, म्हणून अगदी थोडक्यात मुद्रणपद्धतींची लेखकाला आवश्यक असलेली माहिती दिली आहे.

(क) मुद्रणाच्या प्रद्धती मुख्यतः दोन आहेत.

(१) अक्षरमुद्रण (लेटरप्रेस), (२) प्रतिरूपमुद्रण (ऑफसेट)

(ख) अक्षरजुळणीच्या पद्धती

(१) हस्तजुळणी (हँड कंपोझिंग)

(२) यंत्रजुळणी (लाईनो किंवा मोनो/मेकॅनिकल कंपोझिंग)

(३) प्रकाशमुद्रित जुळणी (फोटोटाईपसेटिंग)

(४) मेजस्थ मुद्रायोजन (डी.टी.पी. संगणक)

मराठीतील बहुतांश पुस्तकांसाठी आणि नियतकालिकांसाठी अगदी अलीकडेपर्यंत अक्षरमुद्रण ही एकमेव पद्धती वापरली जात होती. अक्षरमुद्रणामधे हाताने खिळे जुळवून त्याची छपाई केली जाते आणि चित्रे व छायाचित्रांसाठी ब्लॉक्स बनवले जातात. कमी खर्चाची व चाळीस-पन्नास प्रतींपासून काही हजार प्रती छापण्यासाठी ही पद्धती सोयिस्कर आहे.

गेल्या दहा वर्षांपासून अधिकाधिक प्रमाणात प्रतिरूपमुद्रणाने मराठी पुस्तके आणि नियतकालिके छापली जाऊ लागली. प्रतिरूपमुद्रणासाठी फोटोटाइपसेटिंग किंवा डी.टी.पी. संगणकावर जुळणी केलेला मजकूर वापरला जातो. या मजकुराची प्रकाशग्राही कागदावर (ब्रोमाईड पेपर) घेतलेली प्रत अथवा लेझर प्रिंटरवर काढलेले प्रिंटआऊट मूळ प्रत (ओरिजिनल) म्हणून वापरले जाते. त्यावरून कॅमेऱ्याच्या साहाय्याने निगेटिव्ह-पॉझिटिव्ह काढून मुद्रणपत्रे बनवून, त्यांच्यावरून मुद्रणयंत्रांच्या साहाय्याने छपाई होते. ही पद्धती तशी खूप खर्चीक आहे. मोठ्या प्रमाणावर प्रती छापायच्या असतील, तरच ती किफायतशीर ठरू शकते. पण डी.टी.पी. संगणक आले आणि सारे चित्रच बदलले. मजकूरजुळणीसाठी लागणारा वेळ आणि खर्च खूपच कमी झाला. यावर तयार होणारा मजकूर मूळप्रत म्हणून वापरून झेरॉक्स प्रती काढणे शक्य झाले. हाच मजकूर ट्रेसिंग पेपरवर घेऊन फिल्मची बचत करणे शक्य झाले. किंवा झेरॉक्सच्या साहाय्याने पेपरमास्टरवर मजकुराची प्रतिमा घेऊन छोट्या टेबल टॉप ऑफसेट मशीनवर प्रती काढणे सुलभ झाले. झेरॉक्स आणि ऑफसेटचा तसा प्रत्यक्ष संबंध नसूनही झेरॉक्स ऑफसेट शब्दप्रयोग रूढ झाला, तो असा. डी.टी.पी. संगणकावर मिळणारी मजकुराची प्रत ही लेझर प्रिंटरवर लेझरच्या साहाय्याने मिळते, म्हणून त्याला लेझरप्रिंट म्हणायचे.





अनुक्रमणिका

प्रतिरूपमुद्रणाचे व्यावहारिक फायदे लेखकापेक्षा प्रकाशकाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचे आहेत. डी.टी.पी. संगणकामुळे मुद्राक्षरांच्या रचनेतली विविधता तर मिळतेच, शिवाय खर्चही कमी येतो. पूर्वी अक्षरमुद्रणपद्धतीत किमान एक हजार ते तीन हजार प्रती किंमतीच्या दृष्टीने काढणे आवश्यक असे. त्यामुळे कागद, गोदाम, इत्यादींसाठी गुंतवलेली रक्कम दीर्घकाळपर्यंत गुंतून राही. आता पुस्तकाचा खप असेल, त्याप्रमाणे प्रकाशक ३००/५०० प्रती गरज लागेल त्याप्रमाणे छापवून घेऊ शकतो. पुस्तकाच्या मजकुराच्या मूळ प्रती, निगेटिव्हज् सांभाळून ठेवल्या, म्हणजे झाले. अक्षरमुद्रणपद्धतीत दुसरी आवृत्ती काढताना जुळणीपासूनचा सर्व खर्च पुन्हा करावा लागे. प्रतिरूपमुद्रणात फक्त मुद्रणाचा तेवढाच खर्च करावा लागतो.

मुद्रणाच्या दर्जाचा आपण जेव्हा विचार करतो, तेव्हा या दोन्ही पद्धतींमधे काही गुणदोष आढळतात. पण या वैशिष्ट्यांचा अक्षरजुळणीशी देखील संबंध येत असल्यामुळे प्रथम अक्षरजुळणीविषयी थोडक्यात माहिती करून घेणे आवश्यक आहे.

अक्षरजुळणीच्या पद्धतींपैकी हस्तजुळणी आणि डीटीपी संगणकावरील जुळणी या आपल्या दृष्टीने महत्त्वाच्या. कारण लाईनो-मोनो आता पुस्तकांसाठी कुणी वापरत नाही आणि फोटोटाइपसेटिंग पद्धती ही दर्जाबद्दल जागरूक असणारे प्रकाशकच वापरतात.

मुद्रणाची पद्धती कोणतीही असली, तरी दर्जेदार मुद्रण करता येते. फक्त या दर्जाला त्या पद्धतीतील तंत्रज्ञानाच्या मर्यादा पडतात, एवढेच. (वरचढ तंत्रज्ञान वापरून निष्काळजी मुद्रण करणेही अवघड नाही!)

हस्तजुळणीने म्हणजेच खिळे जुळवून केलेला मजकूर अक्षरमुद्रणपद्धतीने छापला जातो. यासाठी वापरली जाणारी मुद्राक्षरे धातूची व सुटी असतात. ती मजकुराप्रमाणे हवी तशी जुळवून पुन्हा पुन्हा वापरली जातात. या मुद्राक्षरांना शंभर-सव्वाशे वर्षांची परंपरा आहे आणि निर्णयसागर टाईपफौंड्रीपासून चालत आलेल्या या मुद्राक्षरांची वळणे आजही आदर्श मानली जातात. आधुनिक अक्षरजुळणीपद्धतींना या मुद्राक्षरांचे अभिजात सौष्ठव अद्यापही जमलेले नाही. 'मौज' प्रकाशनाची अलीकडेपर्यंतची पुस्तके किंवा साहित्य संस्कृति मंडळाचा विश्वकोश ही या प्रकारच्या उत्कृष्ट मुद्रणाची उदाहरणे म्हणून देता येतील.

फोटोटाईपसेटिंग किंवा डी.टी.पी. संगणकावरील अक्षरजुळणी वेगळ्या पद्धतीने केली जाते. इथे धातूची मुद्राक्षरे जुळविण्याऐवजी प्रत्येक मुद्राक्षर छायाचित्रणाच्या पद्धतीने प्रकाशग्राही कागदावर उमटवले जाते किंवा सूक्ष्म बिंदूच्या साहाय्याने एकेक मुद्राक्षर कागदावर तयार होते. यासाठी टंकलेखक करतो, तसा कळफलकाचा वापर केला जातो. कळ दाबताच उमटणारे प्रत्येक अक्षर समोरच्या पडद्यावर बघता येते.

त्यामुळे मजकूर तिथल्या तिथे तपासता आणि दुरुस्त करता येतो.

या अक्षरजुळणीच्या पद्धतीमधे अक्षरवळणांची विविधता आहे. पाहिजे त्या आकारात आणि प्रकारात ती मिळू शकतात. खिळे जुळवण्याच्या पद्धतीमधे मुद्राक्षरे झिजलेली असली, की ती कागदावर नीट उमटत नसत. जुळणी (अलाईनमेंट) नीट नसे. अक्षरे वर–खाली सरकण्याची शक्यता असे. नव्या पद्धतीत हा धोका राहिलेला नाही. डीटीपी, फोटोटाईपसेटिंगवरील अक्षरवळणे अधिक रेखीव, शिरोरेखेकडची अक्षरांची जुळणी अधिक निर्दोष असलेली अशी आहेत. वाचनसुलभतेच्या दृष्टिकोनातून श,ध,भ या अक्षरांना नव्या वळणात पोकळ गाठ दिलेली आहे. पाखडणे व परवडणे यांतला फरक स्पष्ट समजण्यासाठी ख हे अक्षर विनोबा भावे यांच्या सूचनेनुसार असे ('र' चे टोक 'व' ला जोडलेले) असते. मात्र ही अक्षरवळणे रुंद, आवळलेली अशा विविध प्रकारांमधे रूपांतरित करताना तितकी सुडौल राहत नाहीत.

अक्षरमुद्रणामधे जुळणी केलेल्या मजकुराची पानांप्रमाणे बांधणी करण्यामधे वेळ बराच जातो. डी.टी.पी. संगणकावर अक्षरवळणांची निवड, पानाची मांडणी, चित्रे, आकृत्या यांचा समावेश अशा गोष्टी अतिशय जलद आणि अधिक निर्दोष होतात.

मुद्रिते तपासणे आणि दुरुस्त्या करणे जिकिरीचे, पण महत्त्वाचे काम असते. अक्षरमुद्रणपद्धतीमधे चुकांची दुरुस्ती अगदी मजकूर छापला जाईपर्यंत सहजपणे करता येते. कारण एखादे विवक्षित मुद्राक्षर, काना, मात्रा हाताने काढून बदलता येतात. पण प्रतिरूपमुद्रणात अशी सोय नाही. प्रतिरूपमुद्रणासाठी दुरुस्त्या ह्या पहिल्या टप्प्यातच होणे आवश्यक असते. तशी दुरुस्ती झाली नाही, तर केवळ एका दुरुस्तीसाठी संपूर्ण पानाची निगेटिव्ह/पॉझिटिव्ह, छपाईसाठी पत्रा हे सर्व पुन्हा करावे लागते.

डीटीपी किंवा फोटोटाईपसेटिंग करताना मजकूर समोर पडद्यावर दिसत असतो. त्यामुळे तेथेच तो बारकाईने वाचता येतो. लेखकाकडे बहुधा डॉटमॅट्रिक्स प्रिंटरवर काढलेली प्रत पाठविली जाते. त्यावर दुरुस्त्या करता येतात. किंवा लेझर प्रिंटरवर काढलेली प्रत, प्रकाशग्राही कागदावर काढलेली प्रत यावर दुरुस्ती करून ती पुन्हा काढता येते. (प्रकाशग्राही म्हणजे ब्रोमाइड कागदावरील प्रत कागद अतिशय गुळगुळीत असल्यामुळे त्यावर दुरुस्त्या दाखवण्यासाठी इतका सोयीचा नाही. कारण त्यावर पेन नीट उठत नाही. लेझर प्रिंटरवरची प्रत यासाठी अधिक सोयीची आहे.) एकदा कॅमेऱ्यावर निगेटिव्ह घेण्यासाठी मजकूर गेला, की मग मात्र दुरुस्त्या करणे फार खर्चीक होऊन बसते. म्हणून निर्दोष मुद्रणप्रत आणि जुळवलेल्या मजकुराचे त्यानुसार काळजीपूर्वक वाचन करून केलेल्या दुरुस्त्या प्रतिरूपमुद्रणात महत्त्वाच्या आहेत.

असे सांगतात, की हेमिंग्वेला कादंबरीचा मजकूर छपाईला गेल्यावरही सुधारणा करत राहण्याची खोड होती. एका होतकरू लेखकाला त्याने सरळ सांगितले होते, की लेखन तपासण्याची तुम्हांला तीन वेळा संधी मिळते. लिहिलेले वाचताना, टाईप

करताना, व शेवटी प्रूफ वाचताना! प्रतिरूपमुद्रणामधे अगदी अखेरच्या क्षणी मोठे फेरबदल करण्याची चैन आता परवडण्यासारखी राहिलेली नाही!(तसेच, चिं.वि.जोशींच्या एका लेखात वर्णन केल्याप्रमाणे एखाद्या कंपॉझिटरला ऐन वेळी अनुस्वार, काना, मात्रा बदलून सूडही घेता येणार नाही!)

मुद्रणाचा दर्जा दोन्ही पद्धतींमधे राखता येतो. मुद्रणदोष मात्र पद्धत्यनुसार भिन्न असतात. अक्षरमुद्रणामधे अक्षरे शाईने भरणे, झिजवट खिळे वापरणे, भलत्या वळणाची अक्षरे मधेच येणे (रॉंग फॉंट) मजकुरातील शब्द कमी-अधिक ठळक दिसणे, ओळी तिरप्या होणे, प्रत्यक्ष छपाईत खिळा पडणे वा सरकणे, इत्यादी दोष संभवतात. याउलट, प्रतिरूपमुद्रणामधे सर्व मजकूर फिकट छापला जाणे, दुरुस्त केलेली ओळ इतर ओळींपेक्षा कमी अधिक गडद दिसणे, मजकुराभोवती चिकटवलेल्या टेपच्या खुणा उमटणे असे दोष संभवतात. मराठी पुस्तकांच्या मुद्रणासाठी हल्ली फिल्मऐवजी ट्रेसिंग पेपर वापरला जात असल्याने सर्व मजकूर पुरेसा रेखीव आणि गडद असत नाही. शिवाय हलक्या प्रतीचा कागद वापरल्याने कोणत्याही मुद्रणाचा दर्जा खालावतो. फोटोटाईपसेटिंगवर जुळणी करून, निगेटिव्ह फिल्म वापरून केलेले मुद्रण योग्य कागदावर केल्यास अधिक निर्दोष होते. यासाठी 'भाषा आणि जीवन' च्या अंकाचे मुद्रण व 'शांतारामा' किंवा 'कोरा कॅनव्हास' या पुस्तकांचे मुद्रण यांची तुलना करून पाहावी. म्हणजे डीटीपी आणि फोटोटाईपसेटिंग यांतला फरक लक्षात येईल.

मुद्रणपद्धतींची एवढी तोंडओळख लेखकाला पुरेशी आहे. पुस्तक कोणत्या पद्धतीने छापायचे, त्यासाठी कागद कोणता वापरायचा, हे प्रकाशक ठरवतो, हे खरे असले, तरी लेखकाला जर थोडी–फार माहिती असेल, तर उपलब्ध शक्यतांचा विचार करून निर्दोष मुद्रणासाठी तो जरा आग्रही होऊ शकतो आणि साहाय्य करू शकतो. असे साहाय्य प्रकाशक, मुद्रक यांना तर मोलाचे ठरेलच; पण एकूण ग्रंथव्यवहारालाही ते उपकारक ठरेल.

**शासकीय मुद्रणविद्या संस्था, मुंबई ४०००१.**

○○○

# मराठीची लेखनपद्धती आणि शुद्धलेखन

[श्री. दिवाकर मोहनी यांनी श्री. सतीश पोरे, संशोधनप्रकल्पाधिकारी, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तकनिर्मिती व अभ्यासक्रमसंशोधन मंडळ, बालभारती, पुणे ४११००४ यांस, पाठवलेले पत्र.]

सप्रेम नमस्कार.

माझा आपल्याशी परिचय नाही; पण माझ्या मनात सध्या जो विचार अतिशय जोरात चालू आहे, तो आपल्यापर्यंत पोचावा, असे वाटल्यामुळे हे पत्र लिहावयाला घेतले आहे. आपण मला समजून घ्यावे, ही विनंती. आपण अभ्यासक्रमसंशोधन विभागात असल्यामुळे आपणांस तसदी देत आहे. मुद्रक म्हणून काम करता करता माझे लिपीकडे आणि लेखनपद्धतीकडे लक्ष वेधले गेले, त्या संदर्भात हे पत्र आहे.

सध्या पाठ्यपुस्तकमंडळ जी लेखनपद्धती वापरत आहे, तिच्याविषयी मला आपणांपुढे माझे मत मांडावयाचे आहे. माझा मुद्दा मी अगदी थोडक्यात मांडणार आहे.

आधी जोडाक्षरांबद्दल लिहितो व नंतर एकूण शुद्धलेखनाबद्दल.

अलीकडे आपल्या नागरी लिपीविषयी विचार करताना माझ्या असे लक्षात आले, की आपण बोलतो, तेव्हा व्यञ्जनांचा उच्चार करताना जसा त्यांना स्वरांचा आधार देतो, तसाच लिहितानाही व्यञ्जनचिन्हांना स्वरचिन्ह्यांचा आधार देत असतो. त्यामुळे म्हणा, की असा आधार देण्यासाठी म्हणा, आपण आपल्या लिपीमध्ये जे वर्ण किंवा अक्षरे लिहितो, त्यांत म्हणजे त्या सर्व वर्णांत, स्वरव्यञ्जनांची चिन्हे एकमेकांना जोडलेली असतात. मला काय म्हणावयाचे आहे, ते एक उदाहरण घेऊन पुढे स्पष्ट करतो. उदाहरण न ह्या अक्षराचे घेऊ. न मध्ये ᓀ हा व्यञ्जनांश आहे आणि ा हा स्वरांश आहे. ना मध्ये ᓀ हा व्यञ्जनांश आहे आणि ाा हा स्वरांश आहे. नि मध्ये ᓀ हा व्यञ्जनांश आणि ि हा स्वरांश आहे. नी मध्ये ᓀ हाच व्यञ्जनांश आणि ी हा स्वरांश आहे. नु मध्ये ᓀ हा व्यञ्जनांश व ु हा स्वरांश आहे वगैरे वगैरे. ह्यांहून अधिक उदाहरणे देण्याची गरज मला दिसत नाही.

व्यञ्जनचिन्हांना स्वरचिन्हांची किंवा त्यांच्या आधाराची गरज असल्यामुळे ती दोन्ही एकमेकांना चिकटलेली असतात. पुढे जाऊन आणखी असेही म्हणता येईल, की एका वर्णामध्ये एकापेक्षा जास्त व्यञ्जने आली, असली, तरी ती सर्व स्वरचिन्हाला चिकटलेली असतात. आपण पुन्हा न चेच उदाहरण घेऊ. न हा न्‌ा असा तुटक कधीच लिहिला जात नाही. तो न असा सलग लिहिला जातो आणि तो सर्वमान्य आहे. येथे एका वर्णामध्ये एकच व्यञ्जन आहे. अन्न मध्ये तसेच अन्त मध्ये दोन व्यञ्जने आहेत; इन्द्र मध्ये तीन व्यञ्जनें आहेत. ही एकापेक्षा अधिक व्यञ्जने एका ठिकाणी असलेली अक्षरे म्हणजे जोडाक्षरे एकाच स्वरांशाला चिकटलेली आहेत, सलग आहेत. मुद्रणपूर्वकाळामध्ये सर्व लेखन असेच होत असे. अन्न, इंदूर असे लेखन सदोष मानले जात असे. अशा सदोष लेखनाची आणखी काही उदाहरणे खाली देतो.

स्वप्न, महत्त्व, गुप्त, भक्त, राष्ट्र, अग्नि, उद्‌ध्वस्त, शास्त्र, उद्‌युक्त, द्‌व्यर्थी, दारिद्‌र्य / दारिद्र्य, उद्‌घाटन, मुद्‌दाम, सद्‌गुण, धिक्कार, वाङ्‌मय वगैरे.

वरील शब्दांची निर्दोष रूपे स्वप्न, महत्त्व, गुप्त, भक्त, राष्ट्र, अग्नि, उद्‌ध्वस्त, शास्त्र, उद्युक्त, द्व्यर्थी, दारिद्र्य, उद्घाटन, मुद्दाम, सद्‌गुण, धिक्कार, वाङ्मय/वाङ्मय ही होत. ह्या सर्व उदाहरणांवरून असे लक्षात येईल, की जुन्या लेखकांचा स्वरव्यञ्जने एकत्र एकमेकांना जोडून लिहिण्याचा आग्रह होता व तो नियम अपवाद न करता ते सर्वत्र लावीत असत. थोडक्यात काय, तर वरील विवेचनावरून असे स्पष्ट होते, की ज्या नियमाप्रमाणे न हा वर्ण सिद्ध होतो, त्याच नियमाप्रमाणे न्न हा वर्णही सिद्ध होतो; (प्रत्येक वर्णामध्ये स्वरांश कोठे कोठे आहे, ते मी येथे सांगत बसत नाही.) म्हणंजेच जो नियम वर्णांच्या उच्चाराला लागतो, तोच हुबेहूब वर्णांच्या लेखनाला लागतो.

एकदा हा नियम नीटपणे माहीत झाला, समजून घेतला किंवा समजावून दिला, की मग कोणतेही जोडाक्षर वाचणे किंवा रचणे अवघड राहत नाही. पाठ्यपुस्तकमंडळाने जी लेखनपद्धती स्वीकारली आहे, तिच्यात व्यञ्जनचिन्हे एका स्वरचिन्हाला न चिकटविता ती विलग, एकापुढे एक लिहिणेंच योग्य मानले गेले आहे. परंतु हा नियमही काटेकोरपणे सर्व अक्षरांना लावला जात नाही. प्र, ग्र, द्र, ष्ट्र, श्र ह्यांसारखी अक्षरे पूर्वीसारखी लिहिलेली चालतात. पण श पासून होणारी श्र, श्ल, श्न ही सुद्धा श्रीमधल्या श्र सारखी लिहिलेली चालत नाहीत. र हा ्र ह्या रूपांत दुसऱ्या व्यञ्जनाच्या खाली गेलेला चालतो; पण न खाली लिहिलेला मंडळाला चालत नाही. त्यामुळे निम्न सारखे शब्द निम्न असे, अन्न अन्नसारखे हेंगाडे दिसतात; आणि हस्ताक्षरांतले मत्ता (मत्ता) सारखे शब्द मला (मला) सारखे दिसतात. शिवाय लेखनाला त्याचप्रमाणे मुद्रणाला कागद जास्त खर्चावा लागतो.

पण माझा ह्या लेखनपद्धतीला (किंवा वर्णमालेला म्हणू या) विरोध असण्याचे एवढेच कारण नाही. माझ्या विरोधाचे मुख्य कारण असे, की ही अशी अर्धवट पांक्तिक

(partially linear) लिपी वाचण्याची मुलांच्या डोळ्यांना सवय झाल्यानंतर त्यांना जुन्या-शास्त्रपूत-पद्धतीने छापलेले वाचण्याचा त्रास होतो, कंटाळा येतो. पुस्तकांची छपाई जर सर्वत्र एकसारखी नसेल, तर म्हणजे जोडाक्षरे आणि शुद्धलेखनाचे नियम जर सगळीकडे एकसारखे नसतील, तर वाचकाला मजकुरावरून नुसते डोळे फिरवून वाचता येत नाही; त्याला प्रत्येक अक्षर निरखून पाहावे लागते. मनात शब्दांचा उच्चार करून पाहावा लागतो. त्यामुळे वाचनाचा शीण होतो. हा शीण सोसावयाला जे तयार नसतात, ते कोणतीच पुस्तके वाचावयाला धजत नाहीत. दैनिक वृत्तपत्रे किंवा फार तर काही चटकदार साप्ताहिके ते हातांत धरतात. परिणामी आठ-नऊ कोटींच्या महाराष्ट्रात (पूर्वीपेक्षा लोकांची ऐपत पुष्कळ जास्त वाढलेली असताना) एखाद्या गंभीर विषयावरच्या चांगल्या पुस्तकाच्या हजारभर प्रती खपल्या, तरी वाहवा म्हणण्याची पाळी येते. आपल्या शासनाने अत्यल्प किंमतीत उपलब्ध करून दिलेल्या विश्वकोशाच्या दहा हजार प्रती वीस वर्षांमध्ये खपू शकत नाहीत, ही बाब आम्हां महाराष्ट्रीयांना निश्चितच भूषणावह नाही. एकूणच वाचनाचा व त्यांतल्या त्यांत जुन्या पद्धतीने वाचण्याचा इतका कंटाळा तरुण पिढीला आहे, की हरिभाऊ आपटे, वामन मल्हार जोशी, डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर, स्वातंत्र्यवीर सावरकर, नरसिंह चिंतामण केळकर, गोपाळ गणेश आगरकर, इतकेच नव्हे, तर फडके, खांडेकर, माडखोलकर अशा सर्व लेखकांचे व सर्व जुन्या कवींचे साहित्य, जे पुन्हा पुन्हा छापले जावयाला पाहिजे, ते बाजारात उपलब्ध असत नाही. ही परिस्थिती बदलावयाची असेल, तर महाराष्ट्र शासनाने स्वीकारलेले लेखनविषयक धोरण आपणांस ताबडतोब बदलावे लागेल, असे माझे मत आहे.

पाठ्यपुस्तकमंडळाच्या इयत्ता चौथीच्या मराठी बालभारतीच्या अध्यापनपुस्तिकेमध्ये ५९ व्या पानावर महाराष्ट्र शासनाने स्वीकारलेली वर्णमाला दिलेली आहे, मला त्यावरून प्रश्न असा पडतो, की ही वर्णमाला जर महाराष्ट्र शासनाने स्वीकारली आहे, तर ती शासनाच्या इतर प्रकाशनांमध्ये का आढळत नाही? ही फक्त आपल्या मंडळाच्या प्रकाशनांतच का? पुढच्या पिढ्यांना वाचनाची गोडी लागू नये, ह्यासाठी तर हा सारा खटाटोप नाही?

**आता शुद्धलेखनाविषयी**

शुद्धलेखननियमावलीबद्दल माझे आक्षेप पुष्कळ आहेत, पण त्यांचा मी येथे विस्तार करीत नाही. मला मुख्य प्रश्न पडतो, तो असा, की केशवसुतपूर्वकालीन पद्य आणि चिपळूणकरपूर्वकालीन गद्य आपल्या प्रत्येक मराठी भाषकाच्या वाचनात यावे, ते स्वतंत्रपणे वाचून त्याला समजावे, असे आपणांस वाटत असेल, तर त्या प्रत्येकाला तेव्हाचे प्रचलित किंवा रूढ शुद्धलेखनाचे नियम शिकावेच लागणार! म्हणजे दहावीपर्यंत गेलेल्या विद्यार्थ्याला ते नियम शिकल्यावाचून गत्यंतर नाही; वाचकांची त्यातून सुटका

नाही! त्याशिवाय नंतर महामंडळाचे नियम शिकायचे! म्हणजे जुने वाचताना एक नियम, लिहिताना निराळे नियम! सारख्या सवयी मोडावयाच्या; जुने शिकलेले एकदा विसरावयाचे व पुन्हा नवीन शिकावयाचे– हे सारे शिक्षणशास्त्राच्या मूलतत्त्वांच्या विरोधी नाही काय? पहिल्यानेच चांगली सवय लावणे इष्ट नाही काय?

निरनिराळ्या नियमांप्रमाणे केलेले लेखन आळीपाळीने वाचणे हे एकाच पत्रात निरनिराळ्या प्रकारचे अक्षर वाचण्यासारखे किंवा आळीपाळीने निरानिराळ्या कळफलकाचा (keyboard) टाइपरायटर वापरण्यासारखे आहे. अशा वाचनात गती येणे आणि त्याची गोडी लागणे अशक्य आहे. ही साधी गोष्ट आमच्या नियमकर्त्यांच्या ध्यानात येऊ नये, ह्याचा मला मनस्वी खेद होतो. दर दहा-वीस वर्षांनी लेखनविषयक नियम बदलण्याचा आग्रह धरणे हे कोणत्या शास्त्रात बसते, ते मला समजूच शकत नाही. लेखन वाचकाची सोय पाहणारे असावे. लेखकाची नाही, हे त्यांना कोणी सांगावे?

दुसरी व्यावहारिक अडचण अशी, की छापताना काही म्हणी येतात, क्वचित काही अवतरणे येतात. त्या प्रत्येकाचा कालनिर्णय करून त्यांचे शुद्धलेखन ठरविणे हे पाठ्यपुस्तकमंडळाला किंवा पुण्यातल्या मुद्रकांना शक्य असेल, पण आमच्यासारख्यांना नाही. एकच उदाहरण देतो - 'नळी फुंकिली सोनारें, इकडून तिकडे गेले वारें' ही म्हण कशी छापावयाची? जुन्या सानुस्वार पद्धतीने, की नवीन निरनुस्वार?

माझी ही अडचण कोणापुढे मांडावी, हे न समजल्यामुळे व ती वाचकांच्या आकलनाविषयी असल्यामुळे मी आपणांस तसदी देत आहे.

पत्रोत्तर द्यावे, ही विनंती.

आपला नम्र

**दिवाकर मोहनी**

धरमपेठ, नागपूर ४४००१०

(श्री. दिवाकर मोहनी यांनी आपल्या पत्रामध्ये (१) आपल्या लेखनपद्धतीमधील त्यांना जाणवलेली विसंगती आणि (२) शुद्धलेखननियमांच्या वापरातील विसंगती या मुद्द्यांचा ऊहापोह केलेला आहे. या मुद्द्यांचा विचार करून, त्यांवरील आपल्या प्रतिक्रिया जाणकारांनी व्यक्त कराव्यात, अशी अपेक्षा त्यांनी व्यक्त केलेली आहेच.

**- संपादक)**

○○○



अनुक्रमणिका

# मराठीचा मान राखा आणि इंग्लिशचे थैमान रोखा

- वि. ना. साठे

एखाद्या देशात दुसऱ्या देशाचे नागरिक घुसू लागले, तर त्यांच्या विरुद्ध कारवाई करता येते. तसेच, तेलात भेसळ आढळली, तर संबंधित व्यक्तीला शिक्षा होऊ शकते. परंतु एका भाषेत दुसऱ्या भाषेचे शब्द घुसू लागले, तर कायदा त्याची दखल घेऊ शकत नाही. तेव्हा जनजागृती करणे किंवा निषेध व्यक्त करणे एवढे दोनच मार्ग जनतेला खुले असतात. भारतीय भाषांची आज अशीच स्थिती झाली आहे. भारतीय शब्दांना मूठमाती व इंग्लिश शब्दांची स्वैर भरती सध्या चालू आहे; आणि हे आक्रमण भाषेपुरतेच मर्यादित राहिले नसून, आपला पोशाख (प्रामुख्याने महिलांचा) आपल्या चालीरीती, आपली कालगणना पद्धती, आपली वजनमाप पद्धती, इत्यादी सर्व क्षेत्रांत आपलेच बांधव इंग्लिशचे थैमान चालू देत आहेत. या संदर्भात एडमंड बर्क या इंग्लिश मुत्सद्द्यांनी ब्रिटिश पार्लमेंटमध्ये झालेल्या त्यांच्या भाषणात हिंदू धर्म, हिंदूंचे कायदे, आदींचा कसा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे, तो त्यांच्याच शब्दांत खाली देत आहे. शिवाय डॉ. फ्रँक ओ गोरमन यांच्या 'बर्क यांचे राजकीय तत्त्वज्ञान' या पुस्तकातीलही एक परिच्छेद देत आहे.

**India**

(From Burke's speech on the East India Bill, December 1, 1783)

"My next inquiry to that of the number is the quality and description of the inhabitants .... a people for ages civilized and cultivated; cultivated by all the arts of polished life, when we were yet in the woods. There have been princes once of great dignity, authority and opulence. There are to be found the chiefs of tribes and nations. There is to be found ancient and vernerable priesthood, the depository of their laws, learning and history, the guides of the people whilst living and their consolation in death; a nobility of great antiquity......"

(From Dr. Frank O'Gorman's "Edmund Burke : His Political Philosophy", Edition 1973; page 97)

"To some extent Burke was fascinated by the ancient order of

Indian civilization and alarmed at what he took to be desecration at the hands of the East India Company. He idealized Indian society and admired its law, its hierarchy and its religion. He argued that in spite of its turbulent history of invasion and war, India remained a Hindu polity in which the government behaved in accordance with the spirit and institutions of the people. Hastings threatened to destroy the Hindu polity and to innovate by introducing into India alien customs. But Burke hated the idea of trying to anglicize India. It was the duty of the British to extend their original horizons, tolerate alien practices and promote their growth. Most important of all, the system of Indian Law must not be destroyed. In India religious and civil laws were not separate systems, as in England, but part of one uniform system....It was with this above all that Burke was fascinated and wished to preserve it sound and entire."

अशा आपल्या उज्ज्वल मूल्यांचे गणुगान एक परकीय विद्वान करतो, तर आपण त्या मूल्यांना शून्य किंमत देऊन परकीयांचे अंधानुकरण करीत आहोत. याला कारण आपणांस आत्मविस्मृती झाली आहे. आपण स्वत्वच विसरलो आहोत आणि म्हणून रोजच्या रोज नव्या नव्या समस्या आपल्या देशास भेडसावत आहेत. तथापि, या बाबतीत अधिक तपशिलात न शिरता मी मूळ विषयाकडे वळतो.

वर सांगितल्याप्रमाणे सध्या मराठी शब्दांची हकालपट्टी होत असून, त्या जागी इंग्लिश शब्द विराजमान होत आहेत. अतिशयोक्तीने बोलावयाचे झाल्यास ही मराठी शब्दांची कत्तलच म्हणावी लागेल. त्यामुळे आम्हां मराठी अभिमानी जनांच्या भावना दुखविल्या जात आहेत. परंतु ज्यांना मराठीचा अभिमानच नाही (असेच बहुसंख्य आहेत.), त्यांना याचे काही सोयरसुतक नाही. ते आनंदात आहेत. एक जुनी गोष्ट आठवते. एका तान्ह्या मुलाची खरी आई कोणती आणि खोटी कोणती, हे पडताळून पाहण्यासाठी त्याचे दोन तुकडे करावे, असे सुचविताच खाडकन् खऱ्या आईने त्या सूचनेला विरोध केला, तर खोट्या आईने संमती दिली. हा प्रेम असण्याचा व प्रेम नसण्याचा फरक, तसेच, मराठी भाषेचे आज चालू असलेले विडंबन, विटंबन पाहून मराठी अभिमान्यांना संताप येतो. तर इतर जनता ते उघड्या डोळ्यांनी पाहत आहे. किंबहुना त्यात सहभागी होत आहे. तेव्हा त्यांचे डोळे उघडावे, या उद्देशाने हा लेख लिहीत आहे.

एकदा मी पुण्याहून कोल्हापूरला आराम गाडीने जात होतो. माझ्या शेजारी एक ख्यातनाम साहित्यिक बसले होते. त्यांच्याशी बोलताना मी सहज सुचविले, की ड्रायव्हर आणि कंडक्टर यांना मराठी शब्द असावेत. त्यावर ते म्हणाले, की ते शब्द रुळले आहेत. शिवाय त्यांत प्रासही आहे. तेव्हा बदलण्याची आवश्यकता आहेच का? याला मी उत्तर असे दिले, की एखादा शब्द रूढ झाला, म्हणून तो बदलू नये, हे तत्त्व घटकाभर मान्य





अनुक्रमणिका

केले, तर प्रश्न असा विचारावासा वाटतो, की आज पिढ्यान् पिढ्या आपण आई-बाबा म्हणत आलो आहोत. कैक वर्षे ते शब्द आपल्या मुखात आहेत. तर आता डॅडी-मम्मी म्हणण्याची काय आवश्यकता आहे; आणि विशेष म्हणजे, आपली मातृभाषा म्हणायची आणि आपल्या मातेलाच परकीय भाषेतून हाक मारायची, हा केवढा विरोधाभास आहे. शिवाय प्रास हवा असेल, तर सारथी, अर्थी हे शब्द रूढ करावेत. सारथी म्हणजेच सारथ्य करणारा तो ड्रायव्हर आणि अर्थी म्हणजे अर्थव्यवस्था पाहणारा तो कंडक्टर; आणि आनंदाची गोष्ट म्हणजे, प्रथम नकार व्यक्त करणाऱ्या त्या गृहस्थांना ते दोन्ही शब्द आवडले. एवढेच नव्हे, तर ते प्रचारात यावेत, असेही मत त्यांनी व्यक्त केले.

एवढ्यात आमच्यासमोर बसलेले गृहस्थ म्हणाले, की मराठीचे अभिमानी अतिरेकीच असतात. आता सिनेमा हा शब्द घ्या. तो तीन अक्षरी व जोडाक्षररहित आहे. परंतु केवळ इंग्लिश म्हणून तो त्याज्य ठरवायचा आणि चलच्चित्रपट हा सहा अक्षरी व दोन जोडाक्षरांचा शब्द स्वीकारावा, म्हणायचे, हा दुराग्रह नाही का?

ते गृहस्थ बरेच हिशेबी, काटकसरी व आपल्या जिभेला कमी कष्ट पडतील, याची दक्षता घेणारे दिसले. मी त्यांना सांगितले, की इंजिन, फोन, रेडिओ, बँक, सिनेमा, तिकीट अशा शब्दांना मराठीत सामावून घेण्यास आमचा विरोध नाही. संबंधित शोध इंग्लंड- अमेरिकेत लागले. नवीन यंत्रसामग्री तयार झाली व त्याबरोबर नवे शब्दही जन्मले. आपण ती यंत्रसामग्री, तसेच ते शब्दही आयात केले, आत्मसात केले. चीड येते, ती आपल्या भाषेत शब्द असताना इंग्लिश शब्द दत्तक घेण्याचा जो हव्यास आजच्या पिढीला लागला आहे, त्याची.

मी त्यांना पुढे म्हणालो, की आता सारथी हा शब्द घ्या. तो सुद्धा सिनेमासारखा तीन अक्षरी व बिनजोडाक्षरी आहे. उलट, ड्रायव्हर यात चलच्चित्रपटासारखी दोन जोडाक्षरे आहेत. तसाच, अर्थी हा कंडक्टरपेक्षा कमी अक्षरांचा शब्द आहे. तेव्हा तुमच्या तत्त्वानुसार सारथी-अर्थी हे शब्द रूढ होण्यास हरकत नसावी.

पण लांब-आखूड, जोडाक्षरी-बिनजोडाक्षरी हे खरे कारण नव्हेच. तसे असते, तर ताप हा दोन अक्षरी शब्द सोडून टेंपरेचर हा पाच अक्षरी शब्द कोणी उच्चारला नसता. आई-बाबा, मा-पिताजी, भाऊ-बहीण हे सर्व बिनजोडाक्षरी शब्द असताना मम्मी, पप्पा, ब्रदर, सिस्टर हे जोडाक्षरी शब्द उच्चारले गेले नसते. या संदर्भात आणखी एक उल्लेख करावासा वाटतो. माझी एक नातसून म्हणते, की मला आई म्हटलेलं आवडत नाही, म्हणून तिने आपल्या मुलाला मम्मी म्हणायला शिकवलं आहे. तेव्हा इंग्लिशची चटक हेच खरे कारण आहे.

केवळ भाषाच नाही, तर अन्य बाबतींत सुद्धा पाश्चात्त्यांचे अंधानुकरण होत असल्याची जाणीव करून देऊ लागले, तर आपणांस धादांत खोटे समर्थन ऐकावयास





अनुक्रमणिका

मिळते. त्याचा एक नमुना देतो. थोडेसे विषयांतर वाटेल. तरी क्षमस्व.

एका अमेरिकन विचारसरणीच्या मंडळाच्या पुणे शाखेने एक मोठा समारंभ आयोजित केला होता. त्यांच्या एका सभासदाने मला निमंत्रण दिले होते. मी त्या समारंभाला गेलो होतो. प्रथम भाषणे झाली. नंतर भोजनाचा कार्यक्रम झाला आणि शेवटी एकमेकांच्या बायका घेऊन नाचास सुरुवात झाली. मी लगलीच पाठ फिरविली. पुढे काही दिवसांनी त्या सभासदाची गाठ पडली असताना ते म्हणाले, की

तुम्ही लोक पाश्चात्त्यांचे सर्वच त्याज्य समजता. नाही तर त्या दिवशी आमचा नाच सुरू होताच आपण ताडकन उठून गेला नसतात. नाच हा एक प्रकारचा व्यायाम आहे, हे तुम्ही लक्षात घेत नाही. शिवाय पावलेही विशिष्ट पद्धतीने विशिष्ट ठेक्यात पडावी लागतात. उगीच वेडीवाकडी पडून चालत नाहीत.'

यावर मी म्हणालो

'तुमचे म्हणणे खरे असेल. परंतु दुसऱ्याच्या बायकोबरोबर नाचणे हे हिंदू संस्कृतीत बसत नाही. वाटेत जरी आमच्या मित्राची बायको भेटली, तरी तिच्याशी बोलण्याचा आम्हांला संकोच वाटतो. आमच्या एका नाटकात नायकिणीची मुलगी गाणं म्हणते, की

'तनुविक्रय पाप महापापांच्या वसले कळसी
स्त्रियांस भूषण लाज विनय हे कोमल भाव मनीचे'

'म्हणजे आमच्या नायकिणीसुद्धा लाज आणि विनय यांना अलंकाराहून अधिक किंमत देतात. तर घरंदाज बायकांनी परपुरुषाबरोबर नाचणे हे आमच्या संस्कृतीत कसे बसेल?'

पुढे मी त्यांना एक तोडगा सुचविला, की ज्यायोगे आपल्या संस्कृतीला बाधा येणार नाही, शिवाय त्यांच्या इच्छेप्रमाणे व्यायामही होईल, तो तोडगा असा, की त्यांनी पुन्हा एकदा नाचाचा कार्यक्रम ठेवायचा आणि मी माझ्या पंचवीस मित्रांसह सपत्नीक जायचे. त्यांच्या मंडळाचे दोन प्रशस्त महाल आहेत. त्यांपैकी एका महालात फक्त महिला व दुसऱ्या महालात फक्त पुरुष. तिकडे लीला-शीला अशा महिलांच्या जोड्या नाचतील आणि इकडे विनय-विवेक अशा पुरुषांच्या जोड्या नाचतील. लीला-लीला करीत आहे पण शीलाला धरून. तसेच इकडे नाचात विनय-विवेक आहेत. तेव्हा संस्कृतीला बाधा नाही. शिवाय व्यायामाला नाजूक अबलांपेक्षा समबल पुरुष अधिक योग्य. परंतु हा दोन्ही हेतू साधणारा तोडगा त्यांना पसंत पडला नाही. तेव्हा व्यायामासाठी नाच हे म्हणणं खोटं आणि वाकडी पावलं पडून चालत नाही, हे म्हणणं त्याहून खोटं. असा स्त्रीपुरुषांचा संयुक्त नाच हा वाकडे पाऊल पडण्याचा श्रीगणेशाच.

असो, आता मूळ विषयाकडे वळतो.

काही वर्षांपूर्वीची गोष्ट. संभाजी उद्यानात गडकऱ्यांचा पुतळा बसवावयाचा होता. त्यानिमित्त 'भानुविलास'मध्ये 'भावबंधन' नाटक लावले होते. त्याचे तिकीट विकण्यासाठी एक गृहस्थ माझ्याकडे आले होते. मी त्यांना म्हणालो, की गडकऱ्यांच्याबद्दल मला आदर आहे. जुनी नाटके मला आवडतात आणि 'भावबंधन' तर एक उत्तम नाटक आहे. परंतु एका गोष्टीचा उलगडा केलात, तरच तिकीट घेईन, अन्यथा नाही. मी पुढे म्हणालो, नाटक पाहायला येणारे आम्ही प्रेक्षक मराठीचे अभिमानी. तुम्ही नट मराठीचे अभिमानी आणि गडकरी हे मराठी साहित्यातील ताईत- असा नट-नाटककार-प्रेक्षक यांचा त्रिवेणी संगम होणार; परंतु त्या ठिकाणी मराठीला तिलांजली मिळेल, हे मला खटकते. कारण आपल्या नाटक मंडळीचे नाव काय आहे, तर 'प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक असोसिएशन.' पूर्वीच्या काळी मराठीचे अभिमानी नव्हते. परंतु 'गंधर्व नाटक मंडळी', 'बलवंत संगीत मंडळी','महाराष्ट्र नाटक मंडळी' अशी शुद्ध मराठी नावे असत आणि आज मराठीचा अभिमान एवढ्या शिगेला पोहोचला आहे, की हल्ली 'चिल्डरेन्स ॲकॅडमी', 'वेलकम थिएटर्स', 'ॲक्टिव्ह सर्कल' अशी नावे नाटक मंडळींना दिली जातात.

साहित्य क्षेत्रातील दुसरा नमुना. नुकतेच मुंबईला साहित्यिकांचे संमेलन भरले होते. त्यात सरकारने 'बॉम्बे' ऐवजी 'मुंबई' असे नामकरण करावे, असा ठराव संमत झाला. याबद्दल धन्यवाद. परंतु यात 'लोकासांगे ब्रह्मज्ञान' याचा वास येतो. आमच्या साहित्यिकांना महाराष्ट्र सरकारने काय करावे, कर्नाटक सरकारने काय करू नये, यावर चांगले भाष्य करता येते. परंतु हेच साहित्यिक आपल्या लघुकथा – नाटकांना इंग्लिश नावे देतात. त्यात इंग्लिश शब्दही असतात. जणू काय मराठी लिखाण म्हणजे पांढरा भात. त्यात इंग्लिश शब्दरूपी काजू-बदाम पेरल्याखेरीज त्याला चव येणार नाही. या साहित्यिकांच्या सह्या व नावांच्या पाट्या मराठीत असतील, की काय, याची दाट शंका आहे. तेव्हा असे साहित्यिक 'बॉम्बे' शब्द काढून टाका, असा उपदेश सरकारला करू लागले, की 'एकच प्याला' नाटकातील सुधाकराचे एक वाक्य आठवते. तो म्हणतो, 'काल रात्री मनमुराद दारू प्याल्याचा वास अजून ज्याच्या तोंडाभोवती घुटमळत आहे त्यांनी दारू सोडा, म्हणून मला उपदेश करावा!'

बाकी एका अर्थाने गडकऱ्यांचा सुधाकर व हल्लीचे सुधारक गडकरी एकाच माळेचे मणी. एक इंग्लिश मद्यात सापडला होता, तर दुसरा इंग्लिश गद्यात सापडला आहे. तेव्हा सिंधूच्या संसारासारखी मराठी संसाराची तरी दुर्दशा होऊ नये, म्हणून या लेखाचे प्रयोजन. गडकऱ्यांची सिंधु गेली. भारताच्या सिंधूवरही उदक सोडले गेले. सुदैवाने भारताची गंगा, साहित्यगंगा जीवंत आहेत. परंतु गंगेचे पाणी, साहित्याची वाणी आणि साहित्यिकांची लेखणी यांत प्रदूषण निर्माण होऊ लागले आहे. तेव्हा साहित्यिकांना विनंती, की मराठी भाषेचे पावित्र्य राखा आणि तिच्यावरील संक्रांत रोखा.

ही झाली साहित्यिकांची गोष्ट. आता इतरत्र काय चालले आहे, ते पाहू. सध्या इंग्लिशशी सप्तपदी सुरू आहे. इंग्लिश शब्दाकरिता स्वागत–समारंभ आयोजित केला आहे. मराठी शब्दांना इंग्लिश मुखवटे चढवून, सूनमुखही चालू आहे. पुण्यातील शिवाजी महाराजांच्या अश्वारूढ पुतळयापासून नुकत्याच बसविलेल्या संभाजी महाराजांच्या पुतळयापर्यंत गेल्यास आपणांस 'रामा ऑटोमोबाईल्स', 'कृष्णा एंटरप्रायझेस', 'शिवा ॲपरल', 'सूर्या फार्मसी', 'अशोका गार्मेंट' अशा जंगली पाट्या दिसतील. याच मालिकेतील अन्य शब्द म्हणजे महाराष्ट्र, कर्नाटका, विटा, धुलिया, नाशिकचे 'भोसला' इत्यादी. रामा, कृष्णा ही संबोधने आहेत आणि ती विशेषतः नोकरांना उद्देशून म्हटली जातात. आपण रामनवमी, श्रीराम एजन्सी, कृष्णजन्म, श्रीकृष्ण फार्मसी असे म्हणतो. 'भोसला' हा एकेरी शब्द वाटतो. शिवाय त्यात कमीपणा, अनादर व्यक्त केला जातो. विशेषतः, शिवाजी महाराजांच्या आडनावाचा तो अपभ्रंश असल्याने मनाला खटकते.

आता शिक्षणखात्यात शिरू. लेख लांबू नये, म्हणून संक्षिप्त स्वरूपात उल्लेख करतो. हल्लीची शाळा-कॉलेजांची पुस्तके चाळली, तर प्रामुख्याने एक गोष्ट नजरेस येते ही, की मराठी शब्द असताना इंग्लिश शब्दांचे तंतोतंत किंवा विचित्र भाषांतर करून मराठी लिहिले- बोलले जाते. उदा., साधारण व्याज, मनोहर व्याज, हातांतील शिल्लक, हिशेबाची पुस्तके, संगीत रजनी. एका वर्तमानपत्रात जाहिरात प्रसिद्ध झाली होती, की सहकार कायद्याच्या अमुक अमुक कलमान्वये मला प्राप्त झालेल्या शक्त्यनुसार (power) मी असे फर्मावितो, की...वगैरे. येथे (power) याचा अर्थ अधिकार असा आहे. शक्ती नाही.

नुसते शब्दच नव्हे, तर विषय सुद्धा इंग्लिशच्या पावलावर पाऊल ठेवून शिकवला जातो. जमाखर्च (Accountancy) हा विषय घ्या. त्याच्या नावातच त्याचा अर्थ स्पष्ट होतो. त्याच्या क्रमानेच डाव्या बाजूस जमा व उजव्या बाजूस खर्च आपण लिहितो. सालअखेरचे जमाखर्च करताना अमुक खाते जमा व तमुक खाते नावे अशा क्रमाने हिशेब लिहितात. याउलट इंग्लिश पद्धत आहे. तरी मराठी जमाखर्चाच्या पुस्तकात अशी उलटी इंग्लिश पद्धत स्वीकारलेली दिसते. याचे मोठे उदाहरण म्हणजे वर्तमानपत्रात बँकांची नफातोटा खाती प्रसिद्ध होतात. त्यात डाव्या बाजूला खर्च व उजव्या बाजूला जमा सदरे लिहिलेली असतात. मूळ प्रत जरी इंग्लिशमध्ये असली, तरी तिचे मराठीकरण मराठी पद्धतीनेच व्हावयास हवे.

ही इंग्लिश भाषेची नक्कल करण्याची सवय अशीच वाढू लागली तर पुढेमागे खालीलप्रमाणे निवेदन ऐकावयास मिळेल.

"अग, काल आमच्या लग्नाला एक वर्ष पूर्ण झालं, म्हणून आम्हांला माहेरी जेवायला बोलावलं होतं. जेवायला उशीर होईल, म्हणून नुसता चहा न घेता घरून





अनुक्रमणिका

उपासमार (break fast) करून निघालो. ह्यांनी स्कूटर बाहेर काढली व मला लाथ (kick) मारायला सांगितली. तेवढ्यात आमचे सराफ सांगितलेला जिन्नस घेऊन आलेच. ह्यांनी वर्षसणानिमित्त मला मानहानी (necklace) करण्यासाठी त्यांना आज्ञा (order) दिली होती. नंतर आम्ही माहेरी गेलो. माझी झकास आई (grand mother) स्वागताला उभी होतीच. श्रीखंडपुरीचे जेवण झाले. आईने मला जलद (fast) रंगाची साडी व ह्यांना पॅन्ट-तुकडा (pant-piece) दिला. नंतर आम्ही सिनेमाला गेलो. वरच्या दराची तिकिटे मिळाली नाहीत, म्हणून कुटुंबाच्या वाटोळयात (family circle) बसलो.''

अशी आहे आपल्या मराठी भाषेची कहाणी. यात नवीन असे काही नाही. यातील विचार कमी-अधिक फरकाने मराठी भाषकांच्या मनात येत असतीलच. परंतु मोठी अडचण आहे, ती 'पण लक्षात कोण घेतो' याची. 'मुकी बिचारी कुणी हाका' या प्रवृत्तीची. तेव्हा विनंती अशी 'मकर संक्रांतीचा घ्या हलवा', 'कर्करोग हा तुम्ही हटवा', 'हा नाद सोड सोड', 'बोल मराठी शुद्ध गोड.'

**१२२०, सदाशिव पेठ, पुणे ४११०३०.**

○○○

---

**परिषदवार्ता**

## चुकीची दुरुस्ती

'भाषा आणि जीवन'च्या १३:१ हिवाळा १९९५ या अंकात आवरणपृष्ठ दोनवर मुखपृष्ठावरील चित्राच्या चित्रकाराचे नाव 'पल्लवी आपटे' असे असताना चुकून 'पल्लवी बापट' असे पडले आहे. ही चूक नजरचुकीने झाली असून तिच्याबद्दल आम्ही दिलगीर आहोत. वाचकांनी त्या ठिकाणी 'पल्लवी आपटे' असे वाचावे ही विनंती.

**- संपादक.**

# 'ज्ञानेश्वरीकालीन मराठी भाषेवर कन्नडचा प्रभाव' : काही निरीक्षणे

[परीक्षित ग्रंथ - ज्ञानेश्वरकालीन मराठी भाषेवर कन्नडचा प्रभाव, ले. रंगनाथ शामाचार्य लोकापुर, निशांत प्रकाशन, बेळगाव]

**- पंडित आवळीकर**

१) रंगनाथ शामाचार्य लोकापुर यांनी परिश्रमपूर्वक लिहिलेला 'ज्ञानेश्वरीकालीन मराठी भाषेवर कन्नडचा प्रभाव' हा ग्रंथ मला अनेक दृष्टींनी महत्त्वाचा वाटतो. शीर्षकात 'ज्ञानेश्वरकालीन' आणि 'भाषेवरील' ही शब्दयोजना अधिक नेमकी आणि अन्वर्थक ठरली असती. ग्रंथाच्या इंग्रजी उपशीर्षकातील 'era', 'युगीन' बनून आला असता, तर अधिक उचित ठरले असते.

१.१ ज्ञानेश्वरीकालीन मराठी भाषेचा विचार करताना लोकापुर यांचा भर 'ज्ञानेश्वरी' वर आहे. 'लीळाचरित्र', 'रुक्मिणीस्वयंवर' यांसारख्या मोजक्याच महानुभावीय ग्रंथांतील थोडीच उदाहरणे घेतली आहेत. या ग्रंथाबरोबरच महदंबेचे 'धवळे', 'गोविंदप्रभुचरित्र' यांचाही अभ्यास अपेक्षित होता. त्या ग्रंथांतील शब्दसंग्रह प्रस्तुत लेखनात अत्यंत आवश्यक ठरणारा आहे. त्याचप्रमाणे ज्ञानेश्वरांच्या प्रभावळीतील नामदेव, जनाबाई, इत्यादी त्यांच्या समकालीनांतील संतांच्या भाषेला डावलणे ही मोठीच उणीव होय.

१.२ एखाद्या भाषेवरील 'प्रभाव' म्हणजे काय? एखाद्या भाषेने दुसऱ्या एखाद्या भाषेकडून काही 'घेणे'. 'घेणे' म्हणजे कोणी तरी 'देणे' आले. म्हणजेच भाषिक 'देवघेव' आली. देण्याघेण्यांतील वेगवेगळ्या वृत्ती आणि नाती आली.

लोकापुरांच्या मते कन्नड आणि मराठी भाषा आणि भाषी यांतील तत्कालीन नाते जित आणि जेते असे आहे. सहाव्या शतकापासून तेराव्या शतकापर्यंतच्या काळात, मराठी जन्मत वाढत असलेल्या कन्नड राजांच्या काळात, ज्ञानदेवांच्या प्रदेशात, कन्नड सत्तीची होती, असे लोकापुर म्हणतात. 'जबरदस्ती होती का? तसेच असावे. कन्नड ही त्या वेळी राजभाषा होती, राज्यव्यवहाराची भाषा होती, राजकीय व्यवहार त्याच भाषेतून चालायचे, तेव्हा लोकांचा इलाज नव्हता!' (१९) हे केवळ अनुमान झाले. सत्य नव्हे, कारण असा कन्नडच्या जबरदस्तीचा पुरावा उपलब्ध नाही. 'प्रभाव' म्हणजे

'जबरदस्ती', 'नाइलाज' ही लोकापुरांच्या मनात कोठे तरी दडून बसलेली कल्पना त्यांच्या लेखनाची भूमिकाच दूषित करून टाकते. त्यातच भरीला, सामान्य माणसाच्या 'गुलामी' वृत्तीचे नमुने म्हणून ज्ञानेश्वर – नरेंद्रांसारख्या असामान्य कवींच्या काव्यातील अवतरणे देतात आणि लोकापुर मराठीमध्ये, 'सेऊणा' चा 'सिहाणा' झाला आणि 'लट्ट' चा 'लाठ' झाला, असे ठामपणे सांगतात. तत्कालीन सामान्य (मराठी) लोक ना कुणा भाषेचे गुलाम होते, ना कुणा राजाला तो राजा म्हणून 'शहाणा' (सिहाणा) किंवा 'पराक्रमी' (लाठ) म्हणत होते. भाषाविषयक 'प्रभावा'ची ही कल्पना मराठी-कन्नड संबंधांत अनैतिहासिक आणि 'अगा जें जालेंचि नाही' अशी आहे.

१.३ 'मराठी' ने 'कन्नड' कडून जे 'घेतले', ते तीन क्षेत्रांत, भाषा, संस्कृती आणि साहित्य. त्यांतील भाषाविषयक प्रभाव हा लोकापुरांचा अभ्यासविषय. उपर्युक्त तीन क्षेत्रांतले आर्.व्ही. जहागीरदार, शं.बा. जोशी, द.रा. बेंद्रे हे आपले गुरू. त्यांचे 'पाइकपण' आपण केले आहे. असे लोकापुरांचे म्हणणे आहे.

२. आर्.व्ही. जहागीरदार यांनी १९३० मध्ये लंडन विद्यापीठाला सादर केलेला ('Kanarese Influence on old Marathi with special reference to Jnanesvari) या निबंधाचा आपल्या ग्रंथात समावेश करण्यापेक्षा त्यातील विचारांचा मागोवा/परामर्श घेणे हे लोकापुरांकडून अपेक्षित होते. नावाबाबतही जहागीरदारांच्या निबंधाशी नाते सांगणाऱ्या आपल्या ग्रंथातील व्याकरणविषयक प्रकरणातही (पहिली ९८ पृष्ठे) आपल्या गुरूंचा परामर्श, नव्हे, उल्लेखही लेखकाने केलेला नाही.

२.१ दुसरे गुरू बेंद्रे. त्यांचा 'ज्ञानेश्वरपूर्वकालीन कानडी वाङ्मय' (१९३४-३५) हा निबंध आपल्या ग्रंथात पुनर्मुद्रित करून, ओवी- धवळे यांच्यासंबंधी लिहितानाही लोकापुरांनी बेंद्रे यांचा निर्देश केलेला नाही.

२.२ शं.बा. जोशी या तिसऱ्या गुरूंचा प्रस्तुत ग्रंविषयाशी अधिकचा आणि अपरिहार्य संबंध. पण शं.बां.चे विस्मरण झाल्याने 'मऱ्हाटी-कानडे' यांचे 'जुळी भावंडे' हेच शं.बां.नी सांगितलेले नाते दूर राहिले; आणि या संबंधांत 'जबरदस्ती', 'गुलामी', वृत्ती लोकापुरांना दिसली. हळेगन्नड मधील दुर्बोध स्थळे 'मऱ्हाटी' च्या आधारे उलगडणाऱ्या शं.बां.ची दृष्टी लोकापुरांत येणे हे त्यांचे 'पाइकपण' ठरले असते.

२.३ आपल्या गुरूंचे 'पाइकपण' करणे असे राहूनच गेले. यापुढे ते होणार नाही, असे नाही. प्राचीन 'मऱ्हाटी'च्या साहाय्याने हळेगन्नडचे निरीक्षण-निरूपण करीत राहणे कन्नडच्या व्यासंगी लेखकास शक्य आहे. त्यासाठी मऱ्हाटीचा मात्र अधिक सखोल आणि विस्तृत अभ्यास आवश्यक आहे.

३. प्रस्तुत ग्रंथातील मुख्य आणि महत्त्वाचा भाग म्हणजे (९९-३८७) शब्दचर्चा. प्राचीन मराठीतील काही शब्दांची व्युत्पती, रूपांतील आणि अर्थातील बदल यांचा विशेषतः कन्नडमधील प्राचीन साहित्य आणि 'शब्दमणिदर्पणा'सारखा व्याकरणग्रंथ यांच्या साह्याने घेतलेला शोध ही लोकापुरांची लोकोत्तर कामगिरीच म्हटली पाहिजे.

त्यांच्या या शोधाबद्दल मतभेद होतील. त्यांचे म्हणणे खरे (true), खोटे (false) आणि शंकास्पद (doubtful) यांपैकी कोठल्या तरी एका वर्गात घालून सुटका होणार नाही. स्वतः लोकापुरांना जाणीव असलेला अहंकार या लेखनात आहे. शं.गो. तुळपुळे, शं.वा. दांडेकर, इत्यादींचा केलेला उपहास आहे. प्रत्येक शब्द कन्नडच असल्याचा अभिनिवेश आहे. पण तरीही शब्दांवरलीही टिपणे विचार करायला लावणारी आहेत.

३.१ लोकापुरांची काही 'निरुक्ते' या ग्रंथाचे वैभव होत. त्यांची उज्ज्वलता (Illuminating quality) अप्रतिम आहे. अचूक शब्दवेध घेण्याची प्रतिभा त्यांच्याजवळ आहे. आवश्यक ते हळेगन्नडचे पांडित्य आहे. थोडीच पण अशी काही उदाहरणे लोकापुरांच्या या ग्रंथाचा गाभारा ठरतील.

३.२ 'पंधरे-पन्हरे; साडेपन्हरे' या 'ज्ञानेश्वरी'तील शब्दांचे धागे, हळेगन्नडमधील 'पोन्नोरे', 'साटिपोन्नेरे' (पंपरामायण) या शब्दांशी जोडण्याची चोख सुवर्णसंधी लोकापुरांनी घेतलेली आहे. (२७०-७१) पंधरा, साडेपंधरा रुपये असा गद्याळ आणि कालविपर्यस्त भाव सांगणारे शब्दार्थ बाजूला पडले, हे फार मोलाचे आहे.

३.३ 'पहुड', 'उपहुड' (३००-१) या शब्दांच्या मुळाशी 'पवडिसुव' (पंपभारत) आणि 'उप्पवडमं' (राजशेखर विलास) हे हळेगन्नड शब्द आहेत. एवढेच नव्हे, तर 'पोडे' (=पोट) > पवड > पहुड (म्हणजे पोट जमिनीला लावणे!) ही व्युत्पत्तीही पटणारी आहे. ..."या अनुषंगाने ज्ञानेश्वरीच्या शेकडो ओव्यांना अंदाजाने लावलेले अर्थ उजळून निघतात." हे लेखकाचे म्हणणे अतिशयोक्तीचे ठरते, कारण काही ओव्याच उजळणे शक्य झाले आहे. शेकडो नव्हेत. काही उजळल्या जाणे हेही कमी महत्त्वाचे नाही.

३.४ इतरांनी 'अंदाजाने' अर्थ लावले, असे म्हणून आपणही बरेच अर्थ अंदाजानेच लावतो आहोत. (हेही काही वेळा अटळ असते.) इकडे लोकापुरांचे लक्ष जात नाही. 'अंकुन व्हाए' (१००) मध्ये, 'कविराजमार्ग' मधील 'अंकचारणे' आहे. "ज्ञानेश्वरांनी अंकचारणे वरून अंक व्हाए शब्द सिद्ध करून मध्ये अकरणात्मक न शब्द घातलेला आहे." हा लेखकाचा अंदाजच नव्हे काय? त्यामागे आणखी एक अंदाजच : ज्ञानेश्वरांनी 'कविराजमार्ग' हा ग्रंथ वाचलेला होता.

३.५ 'सेस' (३७४-७५) चा संबंध 'सेस भरणे' या लग्नविधीशी आहे. 'धर्मासिनीतीसी सेस भरी' (ज्ञा. ४.५२) यावर 'धर्माचा आणि नीतीचा 'वैवाहिक' संबंध जोडण्यात आला आहे!' असे उपहासाने लिहिण्यात औचित्य नव्हते. 'पंपभारता'पेक्षा अक्कमहादेवींच्या वचनातील 'सेस' ज्ञानेश्वरीतील अर्थ समजण्यास साहाय्यक ठरला असता. 'लीळाचरित्रा'तीलही या शब्दाचा वापर पाहायला हवा होता. अंदाजाबरोबर, प्रश्न आहे तो आवाक्याचाही!

४. 'भाषासिद्धी', 'शब्दसिद्धी' या शीर्षकांखालील लेखनातील विवाद्य स्थळांचा विचार, हा स्वतंत्रच करण्यासारखा आहे; परंतु त्यातील 'देशी'विषयक काही विधाने

या ग्रंथातील शब्दवेध तपासताना महत्त्वाची ठरतात. 'देशी' म्हणजे : 'संस्कृतला वैकल्पिक अशी 'देशाची जी भाषा, ती 'देशी'; ...शुद्ध तेलुगू शब्दांसाठी 'देश्यमु' असा प्रयोग त्या भाषेत होतो, तर हळेगन्नडमध्ये... 'देश्य'... (२०) या विधानांपाठोपाठ लोकापुर लिहितात. ''म्हणून ज्ञानेश्वरांची 'देशी' म्हणजे त्या वेळी त्या प्रदेशात बोलली जाणारी भाषा. ती महाराष्ट्री नव्हे. अपभ्रंश नव्हे किंवा त्यांचे मिश्रण नव्हे, 'देशी' म्हणजे 'देशी'... याचाच अर्थ (हळे) कन्नडमधील असोत वा (जुन्या) मराठीतील असोत. शुद्ध शब्द म्हणजे 'देशी' शब्द. जवळपास एकाच प्रदेशात आणि त्याच्या परिसरात, सहाव्या ते तेराव्या शतकांत बोलल्या जाणाऱ्या भाषेला नंतर कन्नड-मराठी अशी भिन्न नावे आणि भिन्न रूपे प्राप्त झाली. तरी त्यांच्यांतील समान शब्दसंग्रह (common lexicon) कायम राहिला. हाच 'देशी' साठा (stock) होय. प्राकृत, अपभ्रंश यांसारख्या नावांनी अन्य प्रदेशांतील 'बोल'ही या 'देशी' शब्दभांडारात जमा होत गेले. प्रत्येक कोसाप्रमाणेच प्रत्येक दशकाला भाषा बदलते : समान शब्दांबाबतही हेच झाले. माणसांचे, प्रदेशांचे संपर्क वाढू लागले : तीर्थयात्रांसारख्या प्रथांमुळे 'देशी' हे एकदेशीय न राहता 'संचारी' बनले. या शब्दांची रूपे आणि अर्थ ओळखू नयेत, इतकी बदलली. त्यांवर प्रादेशिक, भाषिक नावांची अकारण पुटे चढली. या पुटांचे वज्रलेप झाले.

४.१ आता हे वज्रलेप खरडून काढण्याचे काम संकुचित अभिनिवेश सोडून करावयास हवे. हे करताना 'प्रभाव', उसनवारी, ज्येष्ठ–कनिष्ठ भाव यांसारख्या कल्पना विसरल्या पाहिजेत आणि मराठी-कन्नडपुरता येथे करावयाचा विचार समान 'देशी' शब्दांचे रूपांतर, अर्थांतर, (भाषांतर) देशांतर आणि कालांतर याचा शोध ठरावयास पाहिजे. हेच शब्द 'देशी' म्हणून हेमचंद्रांसारख्यांनी दिले आहेत काय, हे न पाहणे चुकीचे ठरेल.

४.२ 'लट्ट' वरून 'लाठ' (= पराक्रमी) आला, असे म्हणताना 'लट्ठ' हा 'देशी' शब्द आणि 'लट्ठो मनोहर:' हे हेमचंद्राचे स्पष्टीकरण निदान ध्यानात घेतले पाहिजे. 'आगळा' ही असाच 'देशीनाममाळे' त आलेला शब्द आहे. 'पाइअसद्द महण्णवो' हा कोश आणि पुष्पदंताला केवळ पंडिती न ठरविता, 'कविराजमार्ग' परिसरातील 'देशी'-कार मानणे अधिक योग्य ठरले असते. मळखेड, (बसव) कल्याण या परिसरातील 'देशी' चे आविष्कार फार अर्थपूर्ण आहेत.

४.३ (हळे) कन्नड म्हणून दिले गेलेले काही शब्द तमिळ, तेलुगू, यांसारख्या अन्य द्राविडी भाषांतील : त्या द्राविडी प्रदेशातील 'देशी' शब्दच आहेत. काही थोड्याच शब्दांचे 'द्राविडी'पण लेखकाने नमूद केले आहे. पण एम्. बी. एमेनो यांच्या 'द्राविडी भाषांचा व्युत्पत्तिकोश' पूर्णतया अनुल्लेखित राहावा, ही प्रस्तुत ग्रंथातील मोठीच उणीव आहे, की हा अभिनिवेश आहे? 'अडव' (१०२) हा शब्द तुळू. तेलुगू, तमिळ भाषांत 'अड्डु' असा आहे. तर मग 'अडचण' हा कन्नड शब्द कसा?

५. भारतीय भाषांत संस्कृत आणि तद्भव शब्द सोडून जे 'देशी' शब्द आले, त्यांतील 'द्राविडी' अंश फार मोठा आहे. कन्नड ही द्राविडभाषा आहे आणि मराठीचा



अनुक्रमणिका

अंतर्भाव पंचद्राविडात करणे सर्वस्वी चुकीचे नव्हते, असे मला अलीकडे वाटते. गेली तीन तपे मराठी-कन्नड संबंधांचा विचार करीत असताना द्राविड भाषा पंचकाची, त्यातील भाषांच्या आंतरिक नात्यांची, त्यातील भाषिक साम्यांची माझी जाणीव अधिकाधिक गहिरी होत आहे. तशीच या द्राविड- कुळाव्यतिरिक्त मुंडा, गोंडी यांसारख्या ऑस्ट्रो-एशियाटिक भाषांतील शब्दांचा शोध केवळ मराठी-कन्नडमधील नव्हे, तर सर्वच भारतीय भाषांतील 'देशी' शब्दसंग्रहात घेणे अगत्याचे आहे. 'अळुमाळु' हा शब्द हळेगन्नडमध्ये कोठे शोधणार?

५.१ लोकापुरांचे एक गृहीतकृत्य असे आहे. ज्ञानेश्वरांना कन्नडच नव्हे, तर हळेगन्नडही चांगले अवगत होते. ''शिवाय हळगन्नडसारख्या समृद्ध भाषेचाही (ती 'कानडे' असूनही' त्यांनी अर्थपूर्ण वापर केला.' (१९) केशिराजाचे 'शब्दमणिदर्पण'-ही त्यांनी अभ्यासले होते. 'गावरस' वरील टीपेत लोकापुरांनी म्हटले आहे. ''हळगन्नड सूत्र स्वीकारून त्यांनी 'गावरस' हा शब्द घडवला.'' (२०५) एवढेच नव्हे, तर 'काली-वुत परिदुबरे' या काल्पनिक (?) रचनेवरही ज्ञानेश्वरांनी 'पाये देत वरि' ''असे निराळेच समानार्थी शब्द देऊन गंमत केली आहे!'' आपण काय करणार? ज्ञानेश्वरांना तत्कालीन कन्नडमधील 'देशी' शब्द ऐकून (तरी) माहीत आहेत. ग्रांथिक कन्नडच्या त्यांच्या ज्ञानासंबंधी पुराव्यांची आवश्यकता आहे. नाही तर गंमत म्हणून हे ठीक आहे.

५.२ ''मराठी भाषेच्या अभ्यासाची ही एक दुर्लक्षित असली, तरी अपरिहार्य दिशा आहे, हे पंडितांनी मान्य केले, तरी लेखकाला सार्थक वाटेल.'' इतर पंडितांचे मला माहीत नाही, एका 'पंडिता' ने या दिशेला जाताना येणाऱ्या संभाव्य अडचणींचे प्रांजल संसूचन तर केले आहे.

६. लोकापुरांच्या शब्द-विचाराची नुसत्या धावत्या निरीक्षणांवर बोळवण करणे योग्य नाही. त्यांनी दिलेल्या शब्दरूपांवर अर्थांवर पुस्ती-दुरुस्तीवजा टिपणे लिहिणे ही गरज आहे. त्यांनी इतरांनी भराव्यात, म्हणून काही रिकाम्या जागा ठेवल्या आहेत. उदाहरणार्थ, 'वीळ' शब्दाचे त्यांचे निरुक्त (३४६) 'इळि' (होत्तु) म्हणजे संध्याकाळ 'इळि निम्नावतरणे' या सूत्रावरून 'इळि' म्हणजे खाली उतरणे : सूर्य खाली उतरण्याची वेळ. इळि > विळि > वीळु (ज्ञा. ८.१५४) 'वीळ वेऱ्ही, हा 'लीळाचरित्रा' तला शब्द लोकापुरांनी दिला आहे. (सूत्राचा अर्थ माझा) 'इळि' चे हळेगन्नडमधील उदाहरण त्यांना मिळालेले नाही. आता रिकामी जागा कोणती? (सूर्य) चढण्याच्या वेळेला काय म्हणावयाचे? मला सुचणारा शब्द = 'येरवाळी' (= लवकर, अगदी सकाळी) लहानपणापासून माझ्या खेड्यात ऐकलेला शब्द : 'एर् = एरुवुदू' (= चढणे), वेळळे > वेळा > वाळी.

७. लोकापुरांनी वाचण्यासाठी सोडलेल्या 'कोऱ्या जागा' पुष्कळ आहेत.

**बी-३ (पूर्व) वृंदावन सोसायटी, रेंजहिल रोड, पुणे ४११०२०.**

○○○

# साहित्य अकादेमी

## प्रादेशिक कार्यालय

१७२ मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालय मार्ग, दादर (पूर्व), मुंबई - ४०० ०१४
फोन : ४१३ ५७ ४४   फॅक्स : ०९१–२२–४१४७६५०

## महत्त्वपूर्ण मराठी प्रकाशने

### कादंबरी

सात पाऊले आकाशी (गुजराती कादंबरी) ९०/-
कुंदनिका कापडीआ, अनुवादिका : उषा पुरोहित

लोकांचे राज्य (आसामी कादंबरी) ११०/-
वीरेंद्रकुमार भट्टाचार्य, अनुवादिका : शांता ज. शेळके

जा ओलांडुनी (कन्नड कादंबरी) १००/-
सन्तेशिवरा लिंगण्णैया भैरप्पा, अनुवादिका : उमा कुलकर्णी

सहा बिघे जमीन (उडिया कादंबरी) २५/-
फकीर मोहन सेनापति, अनुवादक : उमाकांत ठोमरे

बंड (कन्नड कादंबरी) ८०/-
व्यासराय बल्लाळ, अनुवादिका : मीना वांगीकर

कार्मेलीन (कोंकणी कादंबरी) ६५/-
दामोदर मावजो, अनुवादक : नरेश कवडी

अमृत आणि विष (हिंदी कादंबरी) १८५/-
अमृतलाल नागर, अनुवादिका : उर्मिला जावडेकर

शेजारी (मल्ल्याळम कादंबरी) ४०/-
पी. केशवदेव, अनुवादक : उमाकांत ठोमरे

अंतराळातील स्फोट (वैज्ञानिक कादंबरी) ३०/-
जयंत वी. नारळीकर

अशी धरतीची माया १७५/-
(कन्नड कादंबरी-दुसरी आवृत्ती), शिवराम कारंथ
अनुवादक : रं. शा. लोकापूर

### एकांकिका

निवडक मराठी एकांकिका १६०/-
(दुसरी आवृत्ती),
संपादक : रत्नाकर मतकरी ● सुधा जोशी

### ललित लेखन

माणुसकीच्या ज्योती ६०/-
झवेरचंद मेघाणी, अनुवादक : अच्युतभाई देशपांडे

वा. म. जोशी साहित्य-दर्शन ४०/-
संपादक : वा. ल. कुलकर्णी, गो. म. कुलकर्णी

अलबेरुनीचा भारत (खंड पहिला) ३०/-
अनुवादक : यू. म. पठाण

निवडक चिं. त्र्यं. खानोलकर १५०/-
संपादक : रविंद्र घवी

बाळ सीताराम मर्ढेकर (दुसरी आवृत्ती) ६५/-
यशवंत मनोहर

निवडक पु. भा. भावे (दुसरी आवृत्ती) १५०/-
संपादक : वसंत कृष्ण वऱ्हाडपांडे, राम शेवाळकर

विनोबा सारस्वत (दुसरी आवृत्ती) ११०/-
संपादक : राम शेवाळकर

निवडक श्री. के. क्षीरसागर १६५/
संपादक : व. दि. कुळकर्णी

निवडक मराठी आत्मकथा १४०/-
संपादक : राम शेवाळकर

जवाहरलाल नेहरू १२५/-
एस. गोपाळ, अनुवादक : पुरुषोत्तम आत्माराम चित्रे

निवडक बी. रघुनाथ ७०/-
संपादक : नागनाथ कोत्तापल्ले

### कविता

तृणपर्णे १५/-
वॉल्ट व्हिटमन, अनुवादक : सदानंद रेगे

स्वातंत्र्य लढ्यातील कवने ८५/-
संपादक : राजा मंगळवेढेकर

मुक्तिबोधांची निवडक कविता १८५/-
संपादक : यशवंत मनोहर

पु. शि. रेगे यांची निवडक कविता १६०/-
संपादक : प्रकाश देशपांडे

स्वातंत्र्योत्तर मराठी कविता (१९६१-८०) १५५/-
संपादक : तु. शं. कुलकर्णी

आधुनिक स्तोत्रं ३५/-
निस्सिम एझिकिएल, अनुवादक : प्रदीप गोपाळ देशपांडे

रविकिरण मंडळाची निवडक कविता ४५/-
संपादक : अनुराधा पोतदार, वसंत कानेटकर

### पैसे भरण्याबद्दल सूचना :

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनिऑर्डर कूपनवर किंवा चेक सोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम आणि ती कशा पोटी पाठवली, ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ म्हणून भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

### पत्रिकेची वर्गणी :

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते

- चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ४० रु.
- चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यासाठी वर्षाला ६० रु.
- सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील वर्षापैकी असो) १५ रु.
- परदेशातील व्यक्तींसाठी वर्षाला १० डॉलर.
- परदेशातील संस्थांसाठी वर्षाला १५ डॉलर.
- सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ४ डॉलर इतकी पडेल.

### परिषदेची वर्गणी :

सामान्य सभासदाची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यापैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला. तर इतर सभासदांनी केवळ २० रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ : एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ४० रु. + २० रु. असे एकूण ६० रु. भरावे लागतील.

आजीव सभासदत्वासाठी ४०० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी १०० डॉलर), हितचिंतकासाठी १००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी २५० डॉलर) किंवा जास्त, आश्रयदात्यांसाठी ५००० रु. (परदेशातील व्यक्तींसाठी ५०० डॉलर) किंवा जास्त.

(आजीव, देणगीदार, आश्रयदाता सभासदांना पत्रिकेची वेगळी वर्गणी नाही.)

परिषदेचे सभासदत्व व्यक्तीला मिळेल, संस्थेला नाही.

### जाहिरातीसाठी दर :

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छासूचना १०० रु., आवरण पृष्ठ चार १००० रु., आवरण पृष्ठ दोन / तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक : 0-40048/83

- **आपण मराठी-अभ्यास-परिषदेसाठी काय करणार?**

➢ सभासद नसाल, तर प्रथम स्वतः सभासद व्हा.

➢ सभासद असाल, तर देणगीदार / आश्रयदाते सभासद आणि साधारण / आजीव सभासद मिळवून द्या.

➢ परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल तर चिटणिसांशी संपर्क साधा.

➢ परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम सांभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.

➢ परिषदेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी सहाय्य करा.

➢ परिषदेचे काम वाढविण्यासाठी नवनव्या कल्पना सुचवा.

- **आपण पत्रिकेसाठी काय करू शकता?**

➢ लेखन पाठवा.

➢ परभाषांतून अनुवाद करा.

➢ ग्रंथपरीक्षण लिहा.

➢ 'पुनर्भेट' किंवा 'वाघिणीचे दूध' या सदरास योग्य अशा मराठी किंवा अन्य भाषेतील मजकुराबद्दल सूचना पाठवा.

➢ भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे, इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतर कात्रणे पाठवा.

➢ पत्रिकेत भाषा व्यवहाराशी संबंधित हास्यचित्रे द्यायची कल्पना कशी वाटते?

➢ जाहिरात मिळवून द्या.

➢ संस्था-वर्गणीदार मिळवून द्या.

**● संपर्क ●**
मराठी अभ्यास परिषद
१, शीतल अपार्टमेंट,
४६/४, एरंडवणे, पुणे - ४११ ००४.
(दूरध्वनी : ३३ ३८ ६९)